ण्याचा निश्चय केला. ते चौघान येथें जमून, पुढें कसें काय करावयाचें याचा विचार करीत होते. इतक्यांत, त्यांचेवर मराठ्यांचें दांडगें लष्कर चालून येऊन, त्यांनीं राण्याचे राजवाड्याला वेढा घातला. आणि ते 'नायबदिवाण मौजीराम यास आमचे स्वाधीन करा' असें ह्मणूं लागले. परंतु राणा त्याप्रमाणें करण्यास अगदीं नाखुष असल्यामुळें त्यानें मौजीरामास मराठ्यांचे हवालीं केलें नाहीं. तेव्हां मराठ्यांनीं विशेष आग्रह धरून राण्याला धाक दाखविला व शेवटीं राजवाड्याभोंवतीं गराडा घातलेल्या फौजेला राजवाड्यांत प्रवेश करण्याविषयींही हुकूम दिला. त्याप्रमाणें वाड्यांत धराधरी करण्यास लोक शिरल्याबरोबर आंतमध्यें मौजीराम होताच; त्यानें, आपल्या लोकांकडून त्या आंत शिरलेल्या लोकांच्या मुसक्या बांधिल्या. ह्या पकडलेल्या लोकांत दिवाण मौजीराम याचा जुना व कट्टा शत्रु जो गणेशपंतनाना तो व जमालकर आणि उदाजी कुवर असे सांपडले. ह्यांमध्यें उदाजी कुवर हा फारच दुष्ट आणि क्रूरकर्मा होता. ह्मणून त्याचे गळ्याला हत्तीचा सांखळदंड बांधिला. बाळाराव इंगळे हाही राजवाड्यामध्यें वरील लोकांबरोबरच शिरला होता. परंतु तो, वर सांगितल्याप्रमाणें लोकांची पकडापकडी चाललेली बघून, तेथेंच एका स्नानगृहांत लपला होता; त्यालाही पकडण्यांत आलें. ह्याप्रमाणें, मराठ्यांचे मुख्य मुख्य पुढारी आयतेच पकडले गेल्यावर, चोंडावतांनीं, बाहेर वेढा घालून आंत गेलेल्या लोकांची वाट बघत बसलेल्या लष्करावर स्वारी केली. व पुढें, मराठ्यांचे सैन्याचा जो गोट डोंगरांच्या खोऱ्यांत होता त्यावरही त्यांनीं हल्ला करून त्यांस पळावयास लाविलें. ह्या वेळीं मराठ्यांकडे हियर्से ह्या नांवाचा एक युरोपियन सरदार कवाईत शिकविण्यासाठीं होता, तो सुद्धां ह्या पळापळींत आपले कवाइती लोक घेऊन जेमतेम गाडरमाळा येथें सुखरूपपणें पोंचला. अशी सर्व दाणादाण झाली तेव्हां झालिमसिंगानें आपला मित्र बाळाराव इंगळे यास चोंडावतांचे अटकेंतून सोडविण्याचा निश्चय केला. झालिमसिंगाचे या निश्चयास भाइंदर व लाव्हा येथील ठाकुरांच्या सैन्यापत्यामुळें सुक्तावतांचेंही साह्य मिळालें. आणि ते सर्व मिळून उदेपुराकडे चैजाघाट नांवाचा जो रस्ता जातो त्या रस्त्यानें जाण्याकरितां निघाले. ह्या वेळीं राण्यानें वरील दोघां ठाकुरांस मारून टाकिलें असतें तरी त्यांत त्याजकडे दोष येताना. परंतु राणा हा स्वतः भीरु असल्यामुळें, व त्या ठाकुरांस मारून टाकलें तर सर्व मराठ्यांचा आपल्यावर रोष होऊन ते त्या द्वेषानें चोहोंकडून आपल्यावर घसरतील अशा धाकामुळें, त्यानें वेगळ्या रीतीनें झालिमसिंगाचे हल्ल्याशीं सामना करण्याची तयारी केली. त्यानें सिंधी, अरब, आणि गोसावी वगैरे मिळून दहा हजार सैन्य गोळा केलें; आणि त्या सैन्यावर त्यांचा मोठा शूर जो जयसिंग यास

आपल्या प्रसिद्ध खिची लोकांच्या टोळीसह मुख्य नेमून पाठविलें. खिची लोकांचा आणि मराठ्यांचा अगदीं उभा दावा असून, ते मराठ्यांना अगदीं पाण्यांत पाहत असत. तेव्हां अशा वेळीं त्यांची त्या कामावर योजना करणें जरूरच होतें. राण्याचे लोकांनीं चैजाघाटावर जाऊन तेथें पांच दिवसपर्यंत त्याचें रक्षण केलें. परंतु पुढें त्याच्यानें टिकाव धरवेना असें पाहून, अखेरीस राण्याला आपल्या अटकेंतून बाळाराव इंगळे यास सोडून देणें भाग पडलें. ह्याप्रमाणें झालिमसिंगाचें वजन राण्यावर पडल्यामुळें पुढें त्यानें राण्याकडून जहाजपूर परगणा आणि तेथील किल्लाही आपल्या ताब्यांत घेतला. पहिल्यानें राण्याकडून शौर्य व दमदारपणा दाखविला जाऊन, शेवटीं ह्याप्रमाणें त्याचा कमीपणा दिसल्यावर, मराठ्यांच्या शिरस्त्याप्रमाणें, त्यांनीं झालेल्या लढाईचे खर्चाच्या यादी राण्याकडे पाठविल्या. आणि पुढें, मेवाडावर होळकराची स्वारी येणार आहे, तेव्हां त्यापूर्वी आपली वसुली करून चालतें व्हावें ह्या इरादानें, मराठ्यांनीं आपला पैसा वाटेल त्या रीतीच्या जुलमांनीं आणि अन्यायांनीं वसूल करून घेण्यास बिलकूल कसर केली नाहीं.

वि० सं० १८६० ह्मणजे इ० स० १८०४ ह्या वर्षी पुन: होळकराची स्वारी मेवाडाकडे आली. पूर्वी इंदूरच्या लढाईत पराभव होऊन होळकर उदेपुरावर आला, तेव्हां त्याणें भाइंदरच्या राजावर खंडणी बसविली होती. परंतु ती खंडणी वसूल करण्यास, त्याचे पाठीवर शिंद्याची फौज पाठलाग करीत येत असल्यामुळें, त्याला अवकाश झाला नव्हता. ती खंडणी वसूल करण्यास त्याला ह्या वेळीं फुरसत सांपडली. त्यानें भाइंदर शहर बहुतकरून सफै लुटलें. परंतु त्या लुटींतून जें कांहीं वांचलें तें, त्या शहराचे भोंवतालच्या गांवकऱ्यांनीं होळकरास दोन लाख रुपये जमवून देण्याबद्दलचा आपल्या सह्यांचा लेख करून दिल्यामुळें बचावलें. ह्याप्रमाणें, भाइंदरची वासलात लावून होळकराची स्वारी उदेपुराकडे वळली. तों त्याला राण्याचा वकील अजितसिंग हा मध्येंच भेटला. तेव्हां त्यानें त्याचे जवळ, ४० लाख रुपये खंडणी राण्यानें द्यावी व तींतील तिसरा हिस्सा ह्याचे वेळीं आपल्याकडे पोंचता झाला पाहिजे, असें बोलणें लाविलें. हें बोलणें राण्यानें नाकारतां उपयोगीं नव्हतेंच. कारण, तें ऐकल्यावांचून गत्यंतरच नव्हतें. ह्मणून, राण्यानें आपला राजवाडा सर्व झाडून आणिला. त्याचप्रमाणें, राण्यांच्या वगैरे अंगावरील एकंदर दागदागिने काढून आणिले; आणि त्या सर्वांचें रोकड नाणें करून, होळकराकडे १२ लाखांची भरती केली., तरी, बाकी राहिलेल्या रकमेबद्दल होळकराकडे राण्याकडील लोक ओलीस द्यावे लागलेच. नंतर मग होळकर राण्याला भेटावयास गेला. पुढें होळकरानें लाव्हा आणि बेदनूर ह्या प्रांतांवर हल्ला करून, ते

प्रांत आपल्या ताब्यांत घेतले व पुष्कळ खंडणी घेतल्यावर परत केले. नुस्त्या देवगड संस्थानांतून ४॥ लाख रुपये खंडणी होळकरानें ओढली. ह्याप्रमाणें आठ महिनेपर्यंत होळकरानें मेवाड प्रांतांत नासधूस केल्यानंतर तो हिंदुस्थानाकडे वळला. त्याचे बरोबर राण्याचे मार्फत अजितसिंग गेला; आणि त्यानें आपल्या ४० लाखांपैकीं राहिलेली शिल्लक वसूल करण्यासाठीं बाळारामशेट यास उदेपुरास ठेविलें. होळकर शहापुरापर्यंत गेला तों शिंदा मेवाडांत शिरला; आणि त्या दोघांच्या सैन्यांचा तळ एका ठिकाणीं पडून, त्यांचा इंग्रज लोकांचे विरुद्ध उठण्याचा कट झाला. व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या लष्करी कामगारांची त्या कामाकडे योजनाही केली. परंतु, त्या योजनेप्रमाणें त्या मराठी सरदारांस यश न मिळतां, त्यांची फजिती झाली आणि त्यांच्या सर्व योजना व बेत फसले. इंग्रजांस जय मिळाल्यामुळें राजस्थानाचें पारतंत्र्य अगदींच कायम झालें; व त्या पारतंत्र्यामुळें राजस्थानाला बहुत तोटा सोसावा लागला. तो तोटा भरून काढून, पुनः त्याचें स्वातंत्र्य त्याजकडे देण्याची शक्ति शूर इंग्रज सरकारच्या अंगीं हल्लीं पूर्णपणें आहे. परंतु तशी त्यांना सुबुद्धि होऊन, हें न्यायाचें व सद्विचाराचें काम त्यांचे हातें होण्याचा संभव कमीच आहे!

इ० स० १८०५ च्या पावसाळ्यांत शिंदे व होळकर यांच्या लष्करांचे गोट बेदनूरच्या मैदानांत पडले होते; आणि त्यांचा परस्परांचा, युद्ध सुरू करून एकमेकांचा सूड उगविण्याचा फार मनोरथ होता. परंतु त्या युद्धामध्यें कोणाला आणि कसें काय यशापयश मिळेल याची दोघांनाही भीति होती. कारण, त्या दोघांचीही उत्तर हिंदुस्थानांतली सत्ता आणि अंमल नाहींशीं होऊन, नर्मदा नदीचे उत्तरेकडील व दक्षिणेकडील सर्व निवडक व सुपीक मुलूख त्यांचे ताब्यांतून गेला होता; आणि त्यांच्या मोठमोठ्या फौजा मात्र त्यांचे अंगावर राहिल्या होत्या. त्या फौजांस पहिल्यापासूनच

१. होळकर हिंदुस्थानांत गेल्यावर तिकडे एक इतिहासांत लिहून ठेवण्यासारखी गोष्ट घडली. होळकराचा हरनाथ चेला ह्मणून एक सरदार होता. तो बनसेन प्रांतांतून चालला असतां त्याचे कांहीं उंट शितोळ्याच्या भिल्लांनीं लांबविले. तेव्हां हरनाथानें गुलाबसिंग चोंडावताला बोलावणें पाठवून आणिलें. व त्याप्रमाणें तो आपल्याबरोबर आपले आप्त आठ असामी रजपूत घेऊन आला. त्या वेळीं हरनाथानें त्याला सांगितलें कीं, 'आमचे उंट आह्माला परत आल्याशिवाय तुह्माला आमच्या गोटांतून जातां येणार नाहीं.' दुसरे दिवशीं सकाळीं जेव्हां हरनाथाचे लष्कराचा कूच होऊं लागला तेव्हां त्यानें गुलाबसिंगाला आपला कैदी ह्मणून बरोबर नेण्यास सांगितलें व आपण हत्तीवर चढला. हे अपमानाचे शब्द ऐकिल्याबरोबर गुलाबसिंगानें आपली तरवार नागवी करून हरनाथावर चाल केली. परंतु त्याची तरवार हरनाथाचे हौद्यावर लागून तिचे दोन तुकडे झाले. तेव्हां त्यानें आपली कट्यार घेऊन हत्तीला खुपसली. पुढें गुलाबसिंगाचेंच अनुकरण त्याच्या आठही आप्तांनीं केलें. परंतु शेवटीं ते मराठ्यांकडून कापले गेले.

दोघांही सरदारांनीं (शिंदा व होळकर यांनीं) अगदीं मोकळें सोडून, त्यांच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें लुटालूट करण्यास लाविलें होतें. त्या स्वेच्छाचारी फौजांना जेव्हां पुढें एकामागून एक अपजय आणि अपमान सोसावे लागले तेव्हां ते अतिशय अस्वस्थ होऊन, त्यांचें भान नाहीं सारखें झालें. तसाच, त्यांचा मुशाहिरा त्यांना फार दिवसांत मिळाला नव्हता; त्यामुळें ते फारच संतापून जाऊन त्यांनीं मुलखांवर एकसारखी लुटालूट चालविली. ह्या लुटालुटीमध्यें त्यांनीं अतिशयच निर्दयता दाखविली व आपल्या शौर्याचा त्यांनीं फारच दुरुपयोग केला. त्यांच्या मनामध्यें भूतदयेचा यत्किंचित्ही अंश न राहतां ते केवळ विचारांध झाले होते. ह्यापुढें एकसारखी दहा वर्षेंपर्यंत राजस्थानामध्यें ह्या मराठ्यांनीं जी पुंडाई माजविली होती ती, ह्या इतिहासाचा प्रकाशक कर्नल टॉड् ह्मणतो, 'मीं स्वतः पाहिली आहे.' राजस्थानांतल्या प्रजेच्या संरक्षणाचा सर्वांशीं अभाव होऊन, ह्या मराठी पेंढारानें पोटाला रोजचा शिधा आणि मिळेल तितकी लूट मिळविण्याचे पलीकडे ह्मणून कांहींच लक्ष्य दिलें नाहीं. व येवढेंच काम ह्या फौजेस राहिलें होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या दहा अकरा वर्षांच्या अवधींत ह्या पेंढारी फौजेकडून जो प्रलय माजला व त्यामुळें त्यांची क्रूरता जी लोकांना भोगावी लागली ती कांहीं अतोनातच. लहानसान संस्थानें व राज्यें मोडून जाऊन, सर्वत्र दुर्दशा आणि उजाडी दिसूं लागली. मध्यहिंदुस्थानांतील कित्येक राजांनीं व ठाकुरांनीं एकमत होऊन इंग्रजांना मदत करण्याचें पतकरलें. परंतु त्यापासून ह्मणजे त्यांना तादृश उपयोग झाला असें मुळींच नाहीं. मराठ्यांच्या जुलमापासून सुटून स्वस्थ होण्याकरितां ह्मणून जें त्यांनीं इंग्रजांचें साह्य घेतलें त्या साह्याचा परिणाम अर्थात् भलताच झाला, आणि त्यांना पूर्णपणें पारतंत्र्य मात्र मिळालें. राज्यकारस्थानांमध्यें अशीं, कुंपणानें शेतें खाण्याचीं उदाहरणें अनेक दिसतात व त्यांतीलच हींही आहेत. तेव्हां, त्यांविषयीं आश्चर्य वाटण्याचें कारण नाहींच. असो. त्या वेळीं हिंदुस्थानांत असणारा इंग्रजांचा गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवालीस् याचे मनांत मराठ्यांशीं तह करून आपलें कल्याण करून घेण्याची इच्छा होती. हा तह पहिल्यानें शिंद्याशीं करण्याचें ठरलें. परंतु शिंद्याशीं तह होण्यापूर्वी, वर लिहिल्याप्रमाणें, ज्या रजपूत राजांनीं इंग्रजांचें साह्य घेतलें होतें त्यांत, गोहद आणि ग्वाल्हेर येथील राजा, राघवगड व बहादुरगडचे ठाकूर, आणि भोपाळचा नबाब या सर्वांनीं मिळून, इंग्रजांचा गव्हर्नर जनरल वॉरन् हेस्टिंग्स् याजबरोबर तहनामा केला होता. पहिल्या तिघांस स्वातंत्र्याचें नांव देखील नव्हतें. आणि चौथा ह्मणजे नबाब हा सुदैवयोगें पहिल्यापासूनच इंग्रजांचे अनुसंधानानें चालत असल्यामुळें त्याची ती चाकरी इंग्रजांनीं पूर्णपणें स्मरून त्याप्रमाणें त्याला फैलही दिलें.

इंग्रजांनीं भोपाळच्या नवाबास केवळ आपल्या बरोबरीचा समजून, त्याच्या सर्व अमलाचा कबजा त्याचे ताब्यांत दिला. शिंद्यानेंही इंग्रजांशीं पुढें तह केला; परंतु त्याचें वर्तन भोपाळच्या नवाबासारखें निर्मल व खरेपणाचें न राहून, त्यानें त्यांशीं फार कपट केल्यामुळें, इंग्रजांकडून नवाबासारखें शिंद्याचें कल्याण झालें नाहीं. हें कांहीं असो; परंतु, राजस्थानच्या राजांनीं आणि ठाकुरांनीं एकमतानें जो इंग्रजांशीं तह करून मराठ्यांना हांकून देण्याचा विचार केला, तो विचार, इंग्रजांनीं शिंद्याशीं वेगळा तह केल्यामुळें फसल्यासारखा झाला. कारण, शिंद्यानें अशी अट लाविली कीं, मला ग्वाल्हेर व गोहद हे दोन प्रांत दिल्याशिवाय मी तह करून नेहमीं शांतता राखावयाचा नाहीं. शिंद्याचें व इंग्रजांचें ज्या वकिलांमार्फत हें बोलणें चाललें होतें त्या वकिलांमध्येंच प्रस्तुतचा मूलग्रंथलेखक कर्नल टॉड् हा होता. इंग्रजांनीं शिंद्याचें ह्मणणें कबूल करून त्याप्रमाणें वागण्याचें ठरविलें; आणि आपले मित्र कोण व त्यांचे हक्क आपण कसे राखिले पाहिजेत, हें ते सर्व विसरून गेले; हा त्यांना मोठा कमीपणा होय.

इंग्रजांशीं पुढें लढाई चालली तर आपलीं बायकामुलें व आपली संपत्ति निर्वेध ठिकाणीं ठेवण्यासाठीं कोठें तरी सुरक्षित जागा बघितली पाहिजे व तशी जागा मेवाडदेशांतील मजबूत किल्ल्यांशिवाय नाहीं, असा मराठ्यांनीं विचार केला; आणि ते किल्ले आपल्या ताब्यांत कसे येतील याबद्दल ते काळजी करीत होते. शिंद्याचे दरबारांत राण्याचे तर्फे चोंडावतांचा पक्षपाती जो सरदारसिंग तो असून, शिंद्याचा मुख्य कारभारी अंबाजी हा नवीनच नेमिला होता; व तो सर्व प्रकारें मुखत्यारीनें वागत होता. शिंद्याचे दुसरे आणखी अंबाजीशिवाय बापू चिटणवीस, महादबा हुजऱ्या आणि अण्णाजी भास्कर हेही मंत्री असत. शिंद्याचा कारभारी अंबाजी याचा आणि राण्याचा बेबनाव होता. कारण, राण्यानें लखबादादाला साह्य केलें होतें; आणि लखबा हा अंबाजीचा हाडवैरी होता त्यावरून अंबाजीचें ह्मणणें असें होतें कीं, 'मेवाडांतील रजपुतांचें राज्य मोडून टाकून तें सर्व मराठे सरदारांमध्यें वांटून टाकतों.' परंतु त्याचा हा बेत संग्रामसिंग सुक्तावत याचे अभिमानानें पार पडला नाहीं. संग्रामसिंग सुक्तावत हा होळकराचे दरबारीं होता; व त्याला आपल्या रजपुतांचा अभिमान असल्यामुळें अर्थात् त्याजकडून अंबाजीचे हेतूला हरकत आली. ह्या वेळीं मराठ्यांच्या ह्या हेतूचें निर्बीज करण्यास मुख्यत्वें एक उदार मनाची स्त्री कारण झाली. तिचेंही नांव येथें दाखल न करणें हें चांगलें नाहीं. ही स्त्री ह्मणजे शिंद्याची बायको प्रसिद्ध बायजाबाई ही होय. ही बाई प्रसिद्ध सरजेराव घाटगा याची कन्या असून, तिचें शिंद्यावर फारच वजन असे. तिला रजपुतांवि-

षयींचा मोठा अभिमान असे. तिचें जन्म रजपूतकुळांतीलच असून, जरी तिचा मराठ्यांकडे संबंध झाला होता तरी ती रजपुतांविषयीं मोठी साभिमान असे. ती ह्मणाली, 'कांहीं झालें तरी रजपुतांचा मुख्य राजा जो उदेपूरचा राणा त्याची गादी कमी करणें हें फार नीचपणाचें काम आहे.' मराठ्यांचा कल जेव्हां रजपुतांचा निःपात करण्याचा असल्याचें समजलें तेव्हां रजपुतांनीं आपले आपसांतील द्वेष वगैरे सर्व विसरून जाऊन एकत्र होण्यास सुरुवात केली. शिंद्याच्या दरबारांत जो सरदारसिंग चोंडावत होता तो एकदम शिंद्याचा गोट सोडून, होळकराकडे जो संग्रामसिंग सुक्तावत होता त्यास जाऊन मिळाला. चोंडावत आणि सुक्तावत यांचा बहुत दिवसांचा वैरभाव सर्वप्रसिद्ध आहेच. तथापि, ह्या वेळीं त्यांनीं तो आपला जुना वैरभाव सोडून एकचित्त होण्यास हयगय केली नाहीं, हें योग्य केलें. सरदारसिंग चोंडावत हा जेव्हां संग्रामसिंगास मिळण्याकरितां होळकराचे गोटांत गेला तेव्हां त्याचेबरोबर किसनदास पांचोली हा सभ्य आणि नेकीचा सरदारही होता. ते दोघे होळकराचे गोटांत गेल्याबरोबर त्यांनीं होळकरास विचारलें कीं, 'तुमचाही 'अंबाजीच्याप्रमाणेंच रजपुतांचा निःपात करण्याचा विचार ठरला आहे कीं काय ?' त्यांचा हा मोठ्या अभिमानाचा प्रश्न ऐकून, व राण्याच्या एकंदर वैभवैश्वर्याची आणि शूर रजपुतांची पाहिली कीर्ति व त्यावर आलीकडे त्या राण्यास, त्याचे देशास आणि त्याचे एकंदर रजपूत जातीस जीं दुःखसंकटें सोसावीं लागत आहेत तीं मूर्तिमंत त्याचे डोळ्यांपुढें येऊन, त्यानें एकदम शपथ घेतली कीं, 'असलें काम मी कधींही करणार नाहीं.' आणि, त्यानें उलट त्यांना असें सांगितलें कीं, 'तुह्मीं आपले द्वेष वगैरे सोडून एकचित्त व्हावें; आणि आपसांतील वैरें व फुटी हीं विसरून जाऊन, दोघांही पक्षांनीं एकत्र बसून अफू सेवन करावी, हें अगदीं योग्य आहे.' होळकर त्यांना इतकेंच बोलून थांबला नाहीं. त्यानें, उलट, शिंद्याचे गोटांत निरोप पाठवून राण्याचे वैभवाची आणि अधिकाराची मोठी तारीफ केली; आणि, 'राणा आपला राजाधिराजाधिराज आहे, ह्मणून, त्याचा अपमान करून त्याला वैभवच्युत करणें हें सर्वांशीं अनुचित आहे. ह्यासाठीं आपल्या पूर्वजांनीं राण्यांच्या ज्या मुल-

---

१. रजपुतांमध्यें अफू, कुसुंबा, यांचें व्यसन मोठें जबरदस्त आहे हें सर्वप्रसिद्ध आहे. अफू किंवा कुसुंबा एकत्र बसून सेवन करणें हें मोठ्या प्रेमाचें व अभिमानाचें दर्शक आहे असें तिकडे समजलें जातें. व ही चाल मेवाड, मारवाड, व गुजराथ या प्रांतांत फार आहे.

२. 'राजाधिराजाधिराज' असें ह्मणण्याचें कारण, शिंदेहोळकरांचे राजे पेशवे, पेशव्यांचे राजे सातारचे छत्रपति, आणि छत्रपतींचे राजे उदेपूरचे राणे होत, आणि, अशा परंपरेनें होळकराच्या ह्मणण्याप्रमाणें राणा हा त्यांना 'राजाधिराजाधिराज' होत होता, हें उघड आहे.

त्यांचा अपहार केला असेल ते सर्व मुलूख आपण त्याचे त्याला परत दिले पाहिजेत;' असेंही कळविलें. होळकर हा ह्याप्रमाणें राण्याचे संबंधानें आपली पूज्यबुद्धि बोलून दाखवूनच राहिला नाहीं; तर, आपण बोलतों त्याचप्रमाणें करतों व आपलें अनुकरण इतरांनींही करावें ह्मणून त्यानें त्याच वेळीं, त्याचेकडे राण्याचा जो निंबहेरा प्रांत होता तो राण्याचा राण्याला परत केला. होळकरानें, आपल्याप्रमाणेंच शिंद्यानेंही करावें ह्मणून, त्याला असेंही कळविलें कीं, 'आपण सर्वांनीं राण्याच्या मताप्रमाणेंच वर्तन ठेविल्यास पुढें इंग्रजांबरोबर लढाई चालली तर आपल्याला ह्या प्रांतांत मजबूत किल्ले वगैरे सुरक्षित जागा ज्या पाहिजे आहेत त्या राण्याचे साह्यानें सहज मिळूं शकतील.' होळकराकडून जो हा निरोप शिंद्याकडे गेला तो त्याला अगदीं मान्य होऊन, त्याप्रमाणें वागण्याचें शिंद्यानें ठरविलें; आणि होळकराचा वकील आपलेबरोबर त्यानें ठेवून घेतला. मराठ्यांचे गोट एकमेकांपासून १० कोशांवर होते; व तशांत पावसाची अतिशयच गर्दी उडाली होती; यामुळें एकमेकांकडील दळणवळण राहण्यास मोठी पंचाईत व अडचण पडूं लागली. इतक्यामध्येंच होळकराला अशी बातमी समजली कीं, राण्याकडील कोणी भैरवबक्ष नांवाचा एक वकील टोंक येथें असलेल्या इंग्रजांच्या छावणींत त्यांचा सेनापति लॉर्ड लेक याचेकडे, मेवाडांतून मराठ्यांना काढून देण्यास राण्याला मदत करण्याचें बोलणें लावण्यासाठीं गेला होता. होळकराला हें समजल्याबरोबर त्यानें राण्याचे वकिलांस बोलावणें पाठवून आपल्या समोर आणिलें; आणि तो मोठ्या रागाचे आवेशानें त्यांस ह्मणाला कीं, 'तुह्मी मोठे विश्वासघातकी आहांत.' आणि, असें ह्मणून, त्यानें, ती ऐकिलेली बातमी ज्या अखबारामध्यें प्रसिद्ध झाली होती तें अखबार (वर्तमानपत्र) किसनदासाचे अंगावर फेंकून दिलें; व त्याला विचारलें कीं, 'तुह्मीं मेवाडी लोकांनीं आमच्याशीं अशा रीतीचा दंगा करावा काय ? मी तुह्माला साह्य करण्यासाठीं शिंद्याशीं वांकडा झालों आणि ह्या फिरंगी लोकांशीं लढण्याचा प्रसंग आल्यास आपण सर्व हिंदूंनीं एकत्र होऊन बंधुप्रेमानें एकमेकांस साह्य करावें; असा आमचा विचार होता. त्याचप्रमाणें, तुमच्या राण्यानें आजपर्यंत कधींही दिल्लीच्या बादशाहास देखील आपला राजा व वरिष्ठ असें ह्मटलें नाहीं व कबूल केलें नाहीं, असा ज्याचा मोठा अभिमान चालत आला आहे; त्यानेंच होऊन प्रथमत: इंग्रजांकडे जाऊन तहाचीं बोलणीं लावावीं आणि त्यांच्या अटी कबूल कराव्या; ही मोठी शरमेची गोष्ट आहे ! मी अंबाजीच्या बेतांवर पाणी घातलें तें तुमच्या राण्यानें असें करावें ह्मणून काय ?' होळकरांचें हें सर्व रागाचें बोलणें ऐकून घेऊन किसनदास मध्येंच त्याचा राग शांत करण्यासाठीं बोलूं लागला. तितक्यांत होळकराचा मुख्य कारभारी तात्या ह्मणून

तेथेंच होता, त्यानें त्याला लागलेंच थांबवून तो होळकरास ह्मणाला, 'बघा आतां आपण ह्या रांगड्यांचा प्रामाणिकपणा. ते आपल्यांमध्यें आणि शिंद्यामध्यें बेबनाव उत्पन्न करतील आणि दोघांचाही सत्यानाश करतील. आतां ह्यांच्यावर भरंवसा ठेवून उपयोग नाहीं. ह्यांचा अभिमान सोडून ह्यांना दूर झुगारून द्या आणि शिंदा ह्मणतो त्याप्रमाणें करा. सर्जेरावाला काढून टाका आणि मेवाडची सुभेदारी अंबाजीकडे सांगा. असें जर आपण करणार नाहीं तर माझी आपल्याजवळ राहण्याची खुषी नाहीं. मी शिंद्याकडे जाऊन त्याला माळव्यांत घेऊन जाईन.' तात्याकारभाऱ्याच्या ह्मणण्याप्रमाणेंच होळकराचे दुसरे मंत्रीही ह्मणूं लागले. त्यांत भाऊ भास्कर ह्मणून जो मंत्री होता त्याचें मात्र इतरांसारखें मत नव्हतें. त्याची बाजू राण्याला अनुकूल अशी होती. तथापि, होळकरानें इतरांच्या ह्मणण्याप्रमाणेंच करण्याचें ठरविलें. त्यानें सर्जेराव यास बर्तर्फ केलें; आणि तो आपला मुक्काम हालवून उत्तरेकडे निघाला. तेव्हां त्याचे मागें शूर इंग्रजसरदार जनरल लेक हा लागून, त्यानें त्याला पंजाबपर्यंत हटवीत नेलें.

होळकर उत्तरहिंदुस्थानाकडे जाण्यास निघाला तेव्हां त्यानें मोठ्या उदारपणें असें मात्र कबूल केलें कीं, 'राण्याचें आणि त्याच्या देशाचें रक्षण करण्यास आपण हयगय करणार नाहीं.' आणि, जातांना तो शिंद्यास असें सांगून गेला कीं, 'अंबाजीनें भलत्यासलत्या रीतीनें मेवाडांत अम्मल चालविल्यास त्याजबद्दलची जबाबदारी तुमचेवर आहे.' परंतु, पुढें होळकराचा जसा ठिकठिकाणीं पराजय होत गेला व त्याचें वजन कमी झालें तसा, त्याचेपाशीं शिंद्यानें कबूल केलेला करारही मोडला जाऊन, त्यानें मेवाडावर १६ लाख रुपये खंडणी लादली. जॉन ब्याप्टिस्टाची कवाइती पलटण बरोबर देऊन शिंद्यानें सदाशिवरावास सन १८०६ च्या जून महिन्यांत उदेपुरावर पाठविलें. सदाशिवरावास पाठविण्यामध्यें शिंद्याचे दोन हेतु होते. त्यानें जाऊन आकारलेली खंडणी वसूल करावी; आणि, जयपूरच्या राजाकडून राण्याची कन्या कृष्णाकुमारी इच्याशीं आपल्या पुत्राचें लग्न लावण्याचे संबंधानें बोलणें लावण्याकरितां व वधूला देण्यासाठीं दागदागिने घेऊन जे लोक आले होते त्यांना घालवून द्यावें.

ह्या वेळीं राण्याची स्थिति कशी काय होती याची कल्पना वाचकांना सहज होईल. तो एकामागून एक येणाऱ्या दुःखसंकटांनीं अगदीं बेजार झाला होता. तो आपल्या दुर्दैवानें अगदीं हीनदीन झाला होता; आणि त्याच्या राणेपणाला अत्यंत कमीपणा आणणारे अनेक प्रकार पुढें येऊन ठेपले होते. त्यामुळें त्यानंतर पुढें

१. रांगडे हा शब्द रजपुतांस लावतात. त्याचा अर्थ 'बंडखोर' असा आहे.

कसकसे प्रसंग येणार होते त्याची कल्पनाच नव्हती. उदेपुराजवळ जयपूरच्या राजाकडून लग्नाचें बोलणें लावण्यासाठीं आलेल्या तीन हजार लोकांचा तळ पडला होता. आणि राण्यानें जयपूरच्या राजाकडून आलेल्या पोषाखाचा स्वीकार करून, त्याची मागणी आपल्याला कबूल असल्याबद्दलचें पत्रही त्या लोकांकडे रवाना केलें होतें. परंतु त्याप्रमाणें तें पत्र घेऊन जाणारा जासूद शहापुरापर्यंत पोंचला असेल नसेल; इतक्यांत, मारवाडचा राजा मानसिंग ह्यानेंही राणा भीमसिंग याजकडे आपला वकील विवाहसंबंधाचें बोलणें लावण्याकरितां पाठविला. हें बोलणें लावण्यांत मानसिंगानें अशी सबब लाविली कीं, 'तुह्मीं आपली कन्या मला देण्याविषयींचा वाङ्निश्चय पूर्वींच केला आहे. ह्मणजे, माझ्यापूर्वी जो मारवाडचा राजा होता त्याला तुह्मीं कृष्णाकुमारी देण्याचें कबूल केलें होतें. आतां त्या जागेवर मी आहें. कन्या देण्याचा तुमचा संकेत व्यक्तीवर नसून गादीच्या संबंधानें होता. ती गादी मजकडे आली आहे; त्या अर्थी तुह्मीं आपली कन्या मलाच दिली पाहिजे. आणि, असें न करून दुसरीकडे जर मुलगी देण्यांत आली तर त्यास माझी हरकत येऊन, त्याचें प्रायश्चित्त तुह्माला भोगावें लागेल हें लक्षांत ठेविलें पाहिजे.' मानसिंग हा राणा भीमसिंग याजकडे इतकें बोलणें लावूनच स्वस्थ बसला नव्हता. त्यानें राण्याच्या प्रीतींतला व विश्वासांतला त्या वेळीं असलेला जो अजितसिंग चोंडावत त्यालाही फितूर करून, त्याचेकडूनही आपल्या ह्मणण्याप्रमाणेंच राण्याला त्याची कन्या देण्याबद्दलची मसलत भरण्यासाठीं तयार करून ठेविलें होतें. आणि, त्याप्रमाणेंच, अजितसिंग चोंडावतानें, राण्याचा पूर्वी ठरलेला निश्चय फिरवून काढण्यास कमी केलें नाहीं. ह्या सर्व गोष्टी ह्यापुढें समजण्यांत येतीलच.

राणा भीमसिंग यास पुष्कळ मुलें होतीं. पण त्यांत वर लिहिलेली कन्या कृष्णाकुमारी ही फारच सुंदर, रूपवती, केवळ लावण्याची खाण अशी होती. ती जशी रूपानें सुंदर होती तशीच ती गुणानेंही चांगली होती. तिचें सौंदर्यच तिच्या, तिच्या घराच्या, व तिला मागणाराच्या नाशाला कारण झालें यांत संशय नाहीं. प्राचीनकाळीं अन्हलवाडा येथें जे चावडे कुळाचे राजे राज्य करीत होते त्यांच्या वंशांतील कृष्णाकुमारीची आई होती. ह्मणजे, कृष्णाकुमारी ही कन्या हिंदुलोकांत जीं फारच उत्तम कुळें आहेत त्यांतील एका कुळांतली अशी समजली जात असे. तिच्या सौंदर्यांत लेशमात्र नांव ठेवण्याला जागा नव्हती. जसें तिचें रूप होतें तसाच तिचा बांधाही फारच सुरेख होता. आणि तिच्या बोलण्याचालण्याची ढबही अत्यंत प्रशंसनीय असे. सारांश, सर्व गोष्टींमध्यें ती दुसऱ्याचें मन वेधणारी अशी मनमोहिनी होती. मेवाड देशचे लोक ह्मणत कीं, 'आपल्या देशाला भूषविणारें हें एक अमोल रत्नच आहे!'

वि० सं० १८६२ ह्मणजे इ० स० '१८०६ ह्या वर्षी कृष्णाकुमारीला सोळावें वर्ष लागलें. तेव्हां तिला मागण्या येऊं लागल्या. त्यांत, वर लिहिल्याप्रमाणें मुख्य-त्वेंकरून दोघांच्या मागण्या आल्या. जयपूरचा राजा जगत्सिंग आणि जोधपूरचा (मारवाडचा) राजा मानसिंग या दोघांच्याही मागण्या एकसमयावच्छेदेंकरून आल्या. तेव्हां राणा भीमसिंग ह्याला मोठी पंचाईत पडली. शिंद्यानें जयपूरवाल्या-पाशीं कांहीं पैसा मागितला होता, तो त्यानें दिला नाहीं, ह्मणून शिंद्याचे मनांत जयपूरवाल्याविषयीं वांकडें आलें होतें. तेंच मनावर धरून शिंद्यानें राणा भीम-सिंग यास सांगून पाठविलें कीं, 'तुह्मीं आपली कन्या जयपूरच्या राजास निखालस देऊं नये; त्याचे लोक कन्या मागण्यासाठीं आले आहेत त्यांस परत लावून द्यावें, आणि ती कन्या मारवाडचा राजा मानसिंग यास द्यावी.' परंतु पहिल्यापासूनच भीमसिंगास मानसिंगाला कन्या देण्याचें पसंत नसल्यामुळें, त्यानें शिंद्याचा नि-रोप मुळींच मान्य केला नाहीं. तेव्हां शिंद्याला राग येऊन, त्यानें तोफांसुद्धां आ-पली फौज उदेपुरावर पाठविली. हें भीमसिंगास कळतांच त्यानेंही आपली फौज आणि जयपूरवाल्याकडून कन्या मागण्याकरितां आले होते ते तीन हजार लोक असे शिंद्याच्या फौजेचे तोंडावर पाठविले. शिंद्याच्या फौजेला उदेपूरच्या बारीचे आंत न येऊं देण्याविषयीं राणा भीमसिंग याचे फौजेनें बहुत यत्न केला. परंतु शिंद्याच्या फौजेनें त्यांचा पराजय केला. मग शिंद्यानें किरकोळ फौज डोंगरा-च्या पायथ्याशीं ठेवून हजार लोकांनिशीं आपण पुढें जाऊन उदेपुराजवळ तळ दिला. तेव्हां, राणा भीमसिंग यास जयपूरच्या लोकांस परत पाठविणें व शिंदा सांगेल तें ऐकणें भाग पडलें. शिंदा एक महिनाभर उदेपुरास होता व त्या मुदतींत त्याची आणि राणा भीमसिंग याची गांठ एकलिंगाचे देवळांत पडली.[१]

---

१. ह्या वेळीं शिंद्यानें आपला शौर्यपराक्रम व त्यामुळे आपलें वाढलेलें महत्त्व इंग्रजांस दाख-विण्याकरितां इंग्रजांचे वकिलास त्या ठिकाणीं मुद्दाम बोलावून आणिलें होतें. त्या वकिलाबरोबर ह्या ग्रंथलेखक कर्नेल टॉड्ही तेथें असल्यामुळें त्यानें ह्या वरील भेटीच्या थाटाचें वर्णन अगदीं बरोबर लिहून ठेविलें आहे. एकलिंगाचे देवळांत शिंद्याची व राण्याची भेट झालेली ज्यांणीं बघि-तली, त्यांना त्या उभयतांचे मधील सर्वप्रकारचें अंतर तेव्हांच कळून चुकलें असेल. त्या रज-पूत राण्याचें व त्याच्या पुत्राचें तेज कोणीकडे, आणि त्या मराठ्याचें आणि त्याच्या लोकांचें तेज कोणीकडे! राण्याची संपत्ति, ऐश्वर्य आणि त्याच्या स्वारीचा देखावा हीं शिंद्याला भुलवून टाकण्यासारखींच होतीं. शिंद्याचे मनांत राण्याचे मुलीला मागणें घालावयाचें होतें. परंतु तशी आपली योग्यता नव्हती असे तो समजून होता; व जोधपूरच्या राजाचा पक्ष त्यानें मुद्दाम स्वी-कारला होता. जयपूरच्या राजाचें मागणें राणा भीमसिंगानें कबूल केलें हें शिंद्याला वाईट वाट-ण्याचें कारण इतकेंच कीं, त्याचे मनांत कृष्णाकुमारीचें लग्न ह्याप्रमाणें कोणाशींच न व्हावें,

जयपूरचा राजा जगत्सिंग यानें, आपला अपमान झाला व आशेचा भंग झाला ही गोष्ट चांगली झाली नाहीं, ह्या गोष्टीचा सूड उगविला पाहिजे. असें मनांत आणून, राजा मानसिंग ह्याशीं लढाई करण्याकरितां मोठी फौज मिळविली. इतकी मोठी फौज त्याचें राज्य पूर्ण वैभवास पोंचलें असतांही कधीं एकत्र झाली नव्हती. तिकडे मानसिंगानेंही जयपूरच्या राजास जिंकण्याची प्रतिज्ञा केली. परंतु, ह्या वेळीं असें घडून आलें कीं, मारवाडच्या गादीवर मानसिंग जो बसला होता तो आपल्या खऱ्या वारशाप्रमाणें किंवा हक्काप्रमाणें बसला नव्हता. मारवाडच्या गादीचा खरा वारसदार व हक्कदार दुसराच राजपुत्र होता. परंतु मराठ्यांचे साह्यानें त्या खऱ्या वारसदारास मागें सारून मानसिंगानें जोधपूरची गादी लाटली होती. त्यावरून मारवाडचे कित्येक ठाकूर त्यास पहिल्यापासूनच प्रतिकूल होते. अर्थात् मारवाडच्या पक्षांतही दुफळी झाली. ह्या प्रतिकूल असलेल्या ठाकुरांनीं ही संधि पाहून एक तोतया उभा केला; आणि त्याचे पक्षानें एक स्वतंत्रच फौज जमा झाली. ह्या दुफळ्यांचें प्रकरण फार दिवस धुमसत होतें, तें ह्या लग्नाचे संधीसच अनायासें उभें राहिलें; आणि, तोतयाकडे जमलेली सर्व फौज जयपूरचे राजास जाऊन मिळाली. तेव्हां, जयपूरवाल्यांची एकंदर फौज सव्वा लाख झाली. ही फौज मानसिंगाचे फौजेस जयपूर आणि मारवाड ह्यांच्या मधल्या शिंवेच्या डोंगरांत पर्वतशिर येथें पडली. तेव्हां, मानसिंगाची फौज जयपूरवाल्यांच्या फौजेच्या निम्मे देखील नव्हती. त्या उभयपक्षांची लढाई फार वेळ चालली नाहीं. लवकरच आटोपली. कां कीं, दोहोंकडच्या तोफा सुरू झाल्यावर लवकरच मानसिंगाच्या पदरीं जे ठाकूर होते त्यांतून बहुतेक त्याचा पक्ष सोडून तोतयाला जाऊन मिळाले. तेव्हां, अर्थात्च जयपूरच्या राजास जय मिळाला. आपला पराभव झाला ह्याबद्दल वाईट वाटून, मारवाडचा राजा मानसिंग हा म्यानांतून खंजीर काढून आपल्या पोटांत खुपसण्याच्या

ती अनायासें आपल्याला मिळावी, असा त्याचा हेतु होता; असें लोक बोलतात, परंतु शिंद्याची योग्यता ती काय होती ? त्याचे तोंडाकडे बघितलें ह्मणजे तो कां राजतेजाचा मनुष्य दिसत होता ? मुळींच नाहीं. कोणी तरी हलक्या कुळांतला व नीच वृत्तीचा माणूस असावा असें पाहणारास वाटत असे. तेंच राण्याचे व त्याच्या मुलांचे तोंडांकडे बघितलें ह्मणजे काय वाटत असे ? ते जरी इतके खालावलेले होते तरी, त्यांचे तोंडावर राजतेज चमकत असे. व ते थोर कुळांतले असून, त्यांची वृत्ति फार सभ्यपणाची दिसत असे. 'राणा भीमसिंग हा राजाधिराज दिसत असे. आणि, शिंदा हा यःकश्चित् कोणी तरी हलकासलका नोकर असावा असा,' टॉड् ह्मणतो, 'माझा ग्रह झाला; व दुसऱ्या कोणाचाही असाच ग्रह झाला असता.' राण्याचे तोंडाकडे पाहिलें असतां असें वाटे कीं, त्याचें गतवैभव त्याला मुकाट्यानें परत आणून द्यावें; अशी त्याचेविषयीं ममता उत्पन्न होई.

बेतांत होता. परंतु त्याचाच पक्ष धरून राहिलेले जे ठाकूर त्याजपाशीं होते त्यांणीं त्याचे हातांतील खंजीर ओढून घेऊन, त्याला युक्तीनें रणांगणांतून काढून दिलें. मग तो पळून आपली राजधानी जोधपूर येथें गेला. तेव्हां जयपूरवाल्यांनींही तेथपर्यंत त्याचा पाठलाग केला; आणि जोधपुरास वेढा घातला. जोधपूरच्या लोकांनीं मोठी मेहनत करून सहा महिनेपर्यंत आपला बचाव केला. पुढें यत्न चालेना. शेवटीं जयपूरवाल्यांनीं जोधपूर घेऊन लुटलें तरी, जोधपूरचा किल्ला त्यांचे हस्तगत झाला नाहीं. जोधपूरच्या आसपास वीस वीस कोशपर्यंत देश ओसाड पडला होता. यामुळें जयपूरच्या लोकांस कांहीं दिवसांनीं अन्न मिळेनासें झालें. व त्या फौजेंत फंदफितूरही होऊं लागले. ह्या कारणांनीं जयपूरचा राजा जगत्सिंग ह्यास वाटलें कीं, वेढा उठवून आपल्याला जावें लागेल; तर, जी लूट मिळाली तेवढी तरी पदरीं पाडून घ्यावी. असें मनांत आणून, पर्वतशिरच्या लढाईंत आणि जोधपूरच्या हल्ल्यांत जी लूट मिळाली होती ती, कांहीं फौज बरोबर देऊन जयपुराकडे रवाना केली. परंतु ती जयपुरास जाऊन पोंचली नाहीं. कारण, मारवाडच्या ठाकुरांनीं स्वामीभक्तिपराङ्मुख होऊन आपला राजा मानसिंग ह्याचा पक्ष सोडला होता तरी, त्यांनीं आपल्या देशाचा व जातीचा अभिमान सोडिला नव्हता. त्यांणीं मनांत आणिलें कीं, 'आह्मा मारवाडी राठोडांची जिंदगी ह्या भेकड कच्छवाह लोकांनीं आह्मांदेखत आपल्या देशास लुटून न्यावी हें काय ह्मणून ? हें आह्मास मोठें लांछन आहे. तर ही गोष्ट आपण होऊं देऊं नये.' असें मनांत आणून, त्या मारवाडच्या राठोड ठाकुरांनीं जयपूरवाल्यांचा लागलाच पाठलाग करून, ते नेत असलेली सर्व लूट त्यांजपासून परत आणिली, आणि, जगत्सिंगाच्या फौजेच्या बारा वाटा होऊन, तो जयपुरास परत आला. त्याचीं घोडीं व माणसें थकून, त्यांची फारच दुर्दशा झाली. व ठिकठिकाणीं त्याच्या घोड्यांचीं हाडें व मनुष्यांच्या प्रेतांची राखाडी ह्यांनीं जयपूरच्या आसपासचीं रानें पांढरीं दिसूं लागलीं[1] !

जे ठाकूर मानसिंगाचा पक्ष सोडून वेगळे झाले होते त्यांनीं एक तोतया राजा उभा केला होता, हें वर कळविण्यांत आलें आहेच. त्या तोतयाला मारवाडची

१. टॉड् ह्मणतो, 'हा सर्व नाटकासारखा देखावा माझे देखतांच झाला व तो मीं आपल्या डोळ्यांनीं बघितला. जयपूरच्या राज्याची उन्नति आणि पतन हीं एका दीड वर्षांतच होऊन, जयपूरच्या रंगभूमीवर पडदा पडला. इ० स० १८०६ च्या जून महिन्यांत जयपूरवाल्यांचे फौजेचा तळ उदेपूरच्या घांटाशीं पडला होता; व तो बाजूला सारून त्यांतून मी गेलों होतों. आणि पुढें १८०८ च्या जानेवारी महिन्यांत मी खुद्द जयपुरांतून गेलों तों चोहोंकडे शांत व उद्ध्वस्त दिसत होतें. व वर सांगितलेल्या दुर्दशेचें दर्शन तेथील विस्तृत वाळवंटांवर अस्थिसमृद्धिरूपानें स्पष्ट होत होतें !'

गादी द्यावी असा त्या पक्षाचा बेत होता.' परंतु, त्या तोतयाचा व त्याचे पक्षाच्या लोकांचा घात नवाब अमीरखान पठाण याजकडून मानसिंग यानें करविला. हा अमीरखान पैशाचे लोभानें कोणतेंही नीच कर्म करण्यास मागें पुढें पहात नसे. हिंदुस्थानांत तो एक राक्षसी बुद्धीचा आणि अत्यंत अधम असा मनुष्य असे. तो पहिल्यानें राजा मानसिंग याचे शत्रुवर्गापैकींच होता; परंतु, पुढें तोच होऊन मानसिंगाकडे येऊन ह्मणाला कीं, 'मला अमुक द्रव्य द्याल तर मी तोतया व त्याचे पक्षपाती ठाकूर यांचा नाश करीन.' तें त्याचें बोलणें मानसिंगानें कबूल केल्यावर, अमीरखान यानें कपटानें तोतयाची चाकरी धरिली. त्याचेजवळ त्याची स्वतःची वेगळी फौज आणि तोफखाना वगैरे होताच. त्या सर्व सरदारीथाटानें तो तोतयाचे चाकरीस राहिला. आणि त्या तोतयाला विश्वास येण्याकरितां मुसलमान लोकांचे एका मशिदींत जाऊन त्यानें तोतया व त्याचे ठाकूर ह्यांशीं आपल्या पागोट्याची अदलाबदल केली. मग, हा मोठा बलाढ्य सरदार आपल्याकडे आला हें पाहून, त्या लोकांस मोठा आनंद झाला. पुढें एके दिवशीं सर्व लोक आपल्या डेऱ्यांत मेजवान्या, नाच, रंग, गाणें, बजावणें ह्यांच्या आनंदांत गुंतले असतां घातकी अमीरखानानें एकाएकीं, डेऱ्यांच्या दोऱ्या कापून डेरे त्यांचे अंगावर पाडिले. आणि ह्याप्रमाणें आंतले लोक त्या घोंटाळ्यांत सांपडले असतां, त्यांजवर बाहेरून तोफांचा भडिमार करून त्या सर्वांचा जीव घेतला ! ह्या विश्वासघाताच्या युक्तीनें त्या तोतयाचा नाश झाला. अमीरखानासारखे क्रूर, हिंस्रक, लोभी, विश्वासघातकी आणि अधमाधम असे प्राणी भरतखंडांत फारच थोडे होऊन गेले असतील !

इतका जरी अनर्थ झाला तरी देशाला स्वस्थपणा मिळाला नाहीं. कारण कीं, युद्धाचें जें मूळचें कारण तें कायमच होतें. तें कारण नाहींसें झाल्याशिवाय ह्या शोकपर्यवसायी नाटकाचा शेवट होऊन पडदा पडावयाचा नव्हता. सुंदरी कृष्णाकुमारी इला मागणारे जे दोघे राजे, त्यांतून एकही आपलें मागणें सोडीना. व दोघेही एकमेकांचे प्रतिस्पर्धी बनले. तेव्हां, त्यांचा जो मत्सरानल चेतला तो, त्याजवर त्या सुंदरीचें रक्तसिंचन झाल्यावांचून विझेलसा त्या दुष्ट खानाला दिसेना. व त्यानेंच अशी कल्पना काढली कीं, ह्या युद्धाचें मूळ जी कृष्णाकुमारी, तिच्या जिवाचा बळी देऊन युद्धाचें कारण नाहींसें करावें हें बरें. ह्याप्रमाणें, आपल्या प्रकृत नाटकाचा प्रवेश बदलून, आतां आपल्याला जोधपूरच्या उजाड किल्ल्यापुढील मैदानांतून, आनंद व समाधान वसणाऱ्या उदेपूरच्या खोऱ्यांत गेलें पाहिजे. कारण, तिकडे सुंदरी कृष्णाकुमारी इच्या विवाहमंगलकार्याचे ठिकाणीं तिच्या अतिदुःखद प्रेतयात्रेचीच सिद्धता चालली असल्याचें पाहण्याचा आतां आपल्याला प्रसंग येणार आहे !

बिचारी कृष्णाकुमारीबाई ! अहाहा ! राजस्थानाला अत्यंत भूषणभूत रत्नच तें ! देवानें अत्यंत कुशलतेनें जिची मूस ओतली होती ! अद्वितीय रूपसुंदरी ! विश्वकर्म्याला आपल्या अपूर्व कारागिरीची सार्थकता, ह्या तरुणी कृष्णाकुमारीला निर्माण करूनच झाली, असें वाटत असेल ! अवघ्या राजस्थानाची ती अत्यंत आवडती व प्रिय वस्तु ! ज्याला त्याला तिचा धन्यवाद गाइल्यावांचून राहवतच नसे ! अशा त्या रूपसुंदरीचा कोणत्या निर्दयपणानें अंत झाला ? त्या गोष्टीस पाऊण शतकावर जरी वर्षें अतिक्रांत झालीं आहेत व ती कुमारी जरी केवळ स्मृतिशेष राहिली आहे, तरी, तिच्याविषयींचें वर्णन करितांना वाणी सद्गदित झाल्यावांचून आणि डोळ्यांतून टिपें आल्याबांचून राहत नाहींत !

तो घातकी आणि दुष्टकर्मा अमीरखान हा, राजस्थानांतील युद्धाचें मूळ कारण जी कृष्णाकुमारी तिच्या जिवाचा बळी देण्याची खटपट करण्यासाठीं उदेपुरास येऊन, त्यानें राण्याचा वकील जो अजितसिंग त्याचे द्वारें राण्याशीं बोलणें लाविलें. अजितसिंग हा तरी मोठा लोभी, भेकड आणि आत्महितावर नजर देणारा असा असल्यामुळें, अमीरखानाला आपला हेतु सिद्धीस नेण्यास अवकाश झाला. नीचाला नीच मिळाल्यावर जगावर काय काय अनर्थ उसळतील ते कोणीं सांगावे ? अजितसिंग दिसण्यांत अगदीं साधा, डामडौल न आवडणारा, धार्मिकवृत्तीचा, मानापमानाविषयीं पर्वा न बाळगणारा आणि गरीब असा दिसे; परंतु, अंतर्यामीं वर लिहिल्याप्रमाणें, महालोभी, आणि केवळ आत्महितनिरत असाच असे. त्याजकडे अमीरअल्ली हा प्रथमतः येऊन भेटला; व त्यास आपला हेतु कळवून, त्याचे मार्फत त्यानें राण्याला आपला हेतु कळविला कीं, 'मुलगी राजा मानसिंग ह्यास द्यावी, नाहीं तर तिचा जीव घेऊन लढाईचें प्रकरण मिटवावें.' अजितसिंगाच्या ह्या बोलण्यावर राणा भीमसिंगाचे मनांत आलें कीं, 'आपली प्रिय कन्या राठोड राजास द्यावी हें बरें नाहीं. आणि, त्याला जर न दिली तर हा दुष्ट पठाण त्याबद्दलचा सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं. तो आमचे राजवाड्यांवर हल्ले करून मुलीची आणि सर्व राणीलोकांची अब्रू घेईल ह्यांत संशय नाहीं. इतकें संकट आणून घ्यावें त्यापेक्षां, मुलीचाच जीव घ्यावा हें बरें.' आणि, असें भीमसिंगाचे मनांत आल्यावरून त्यानें कृष्णाकुमारीचा जीव घेण्याचाच निश्चय ठरविला; व त्या निश्चयास पूर्वीं ठरल्याप्रमाणें, अजितसिंगाचें तर पूर्ण अनुमोदन मिळालें.

प्रथमतः हें कृत्य पुरुषाचे हातानेंच करवावें असें ठरलें होतें. आणि तें हलक्यासलक्या मनुष्याचे हातानें करवूं नये असें ठरलें होतें. कारण, राण्याचे जनानखान्यांत ही गोष्ट कळतां उपयोगी नव्हती. बायकांच्या हातानें जर हें कृत्य करविण्याचें

मनांत आणिलें तर ती गोष्ट जनानखान्यांत तेव्हांच कळून, अगोदरपासूनच चोहों-कडे गवगवा होईल, ही भीति होती. ह्मणून राण्याचे घराण्यांतलाच महाराज दौलतसिंग ह्मणून राण्याचा कोणी भाऊबंद होता, त्याजपाशीं अजितसिंगानें गोष्ट काढली कीं, 'उदेपूरची अब्रू राखण्यासाठीं हें कृत्य आपलेकडून झालें पाहिजे.' ते शब्द ऐकल्याबरोबर महाराज दौलतसिंग याचे अंगावर रोमांच उभे राहिले. आणि तो मोठ्या आवेशानें ह्मणाला कीं, 'ज्या जिभेनें ही असली नीचपणाची गोष्ट करण्याविषयीं तुह्मी मला सुचवितां आहां ती तुमची जीभ झडो ! आणि अशा रीतीनें जर आपली स्वामीभक्ति खरी होणार असेल तर ती जळो स्वामीभक्ति ! मला कांहीं गरज नाहीं !' ह्याप्रमाणें महाराज दौलतसिंग तें काम करण्याचें पत्करीना. तेव्हां हें काम कोणास सांगावें ? असा विचार पडला. मग राण्याचाच एक महाराज जवानदास ह्मणून भाऊ होता, त्याजपाशीं अजितसिंगानें गोष्ट काढली कीं, 'हें काम तर झालेंच पाहिजे. हें हलक्या मनुष्याचे हातानें व्हावयाचें नाहीं; आपल्या हातून होईल. ह्यासाठीं, आपण मनावर घेऊन हें काम केलें पाहिजे.' असें बोलून त्यानें त्याचें मन वळवून घेतलें. नंतर तो जवानदास हातीं खंजीर घेऊन, कृष्णाकुमारीच्या महालांत गेला. परंतु तेथें गेल्यावर त्या कुमारीचें तारुण्य आणि सौंदर्य त्याचे दृष्टीस पडल्याबरोबर त्याचे मनाला मोठा धक्का बसला. आणि तेणेंकरून त्याचे हातांतला खंजीर खालीं पडला; व तो फार दुःखी होऊन तेथून निघून गेला. तिची आई जवळ होती; तिनें तो खंजीर पाहतांच तिला समजलें कीं, 'हा खंजीर माझे मुलीचा जीव घेण्यासाठीं येथें आला.' मग तिनें जो रडून आकांत केला, तेणेंकरून राजवाडा दणाणून गेला ! तिनें अनेक वेळां किंकाळ्या फोडल्या, व आपल्या कुमारीच्या नाशास प्रवृत्त झालेल्यांस अनेक प्रकारचे वाईट शाप दिले. आणि, 'अहो ! कोणी दया करा; अहो ! कोणी माझ्या मुलीचें रक्षण करा; अहो ! कोणी माझ्या मुलीचा प्राण वांचवा,' असें ज्याला त्याला ती ह्मणूं लागली ! इतकें झालें तरी ती कुमारी अगदीं गडबडली नाहीं. ह्या रीतीनें ह्या वेळीं तिचें मरण तहकूब झालें, परंतु अगदीं बंद झालें नाहीं. नंतर 'हें काम पुरुषाच्या हातून होत नाहीं, तर बायकांच्या हातून करवावें; खंजीर रद्द झाला, तर विषाचा पेला तयार करावा;' असें अजितसिंगानें ठरविलें. मग बायकांच्या हातानें विषाचा पेला तयार करवून राण्याच्या नांवानें कृष्णाकुमारीला निरोप धाडला कीं, 'हा पेला घ्यावा.' तेव्हां, तिनें बापाचा निरोप ऐकून, निरोप सांगणारणीच्या हातून तो पेला आपल्या हातीं घे-

---

१ टॉड् ह्मणतो, 'ह्या पुरुषाला मी पूर्णपणें ओळखत होतों. फारच बिचारा प्रामाणिक व सन्मार्गवर्ती होता.'

ऊन, तेथूनच बापास वंदन केलें; आणि, आपल्या बापाचें आयुष्य दीर्घ व्हावें व त्याचें यश वाढावें ह्याविषयीं देवास प्रार्थना करून, नानू न करितां, ती तो विषाचा पेला प्याली ! तिची आई जवळ होती. तिनें हें कृत्य पाहून, कावरीबावरी होऊन, राण्यावर शिव्यांचा वर्षाव केला व रडण्याचा आकांत मांडिला ! परंतु कृष्णाकुमारीच्या डोळ्यांतून किंचित्‌ही असूं निघालें नाहीं. तिनें उलटें आईचें समाधान केलें. ती ह्मणाली, 'अगे आई, तूं आपणास इतकें कां दुःख देतेस ? माझ्या दुःखाचा शेवट होतो हें तूं जाणत असतां, इतका आकांत कशाला करितेस ? मला मरायाचें कांहीं वाईट वाटत नाहीं. मी रजपुताची बेटी तुझ्या पोटीं आलें आहें ना ? मीं कां मरणाला भ्यावें ? रजपुतांच्या मुली जन्मास आल्या कीं, त्यांचें मरण जवळच असतें. माझ्या बापानें इतके दिवस मला वांचूं दिलें हाच त्याचा मजवर उपकार आहे.' अशा समाधानाच्या गोष्टी आईशीं बोलत आहे तों, प्यालेलें विष पोटांत न राहतां उमळून वर आलें, आणि ओकून पडलें. मग दुसरा विषाचा पेला तयार करून आणिला, तो ती प्याली; पण तोही ओकून पडला. त्यावर तिसरा पेला तयार झाला, तोही ती पिऊन गेली; परंतु तें विष पोटांत राहिलें नाहीं. तेंही लागलेंच ओकून पडलें. ह्याप्रमाणें तीन वेळ झालें; तरी, ह्या क्रूर कर्माचे प्रवर्तक जे पठाण व अजितसिंग त्यांस तें काम शेवटास नेल्यावांचून राहवेना. ह्मणून त्यांनीं शेवटचा उपाय हा केला कीं, कुसुंबा ह्मणजे अफूचें पाणी घालून पेला तयार केला. तीन वेळां जेव्हां विषाचे पेल्यानें कांहीं परिणाम झाला नाहीं तेव्हां असें वाटूं लागलें कीं, सिसोदिया कुळाचा मूळ पुरुष जो बाप्पा रावळ त्याचें शरीर जसें महान् महान् संकटांतून वांचत असे तसेंच कृष्णाकुमारीचेंही शरीर अजरामर आहे कीं काय ! परंतु अति दुष्ट बुद्धीचे आणि पाषाणहृदयाचे जे पठाण अमीरखान आणि अजितसिंग यांस कुमारीकृष्णेचा अंत झाल्यावांचून स्वस्थता नव्हती. विषप्रयोगाचा एकेक प्रसंग निष्फल होत होता तों तों त्या उभयतां कालपुरुषांचें क्रौर्य जास्त जास्त वाढून, ते जास्त जास्त भयंकर उपाय योजून कृष्णाकुमारीच्या जिवाचा बळि पाडण्याविषयीं अधिकाधिक यत्न करीत. शेवटीं, वर लिहिल्याप्रमाणें, चौथ्यानें पेला तयार केला. तो पेला येतांच कृष्णाकुमारीनें हातीं घेऊन हास्यवदन केलें; आणि, 'ह्याचा तरी परिणाम लवकर होवो!' असें बोलून तिनें तो झट्‌कर पिऊन टाकला. ह्या चवथ्या पेल्यानें त्या पाषाणहृदयी लोकांचा बेत सिद्धीस गेला ! येथें, ह्या शोकपर्यवसानी नाटकाचें हृदयभेदक वर्णन करणाऱ्या भाटांचेच शब्द आह्मी उतरून घेतों:—"कृष्णाकुमारीला लवकरच झोंप लागली. ती जी एकदां निजली ती पुनः उठली नाहीं !" ह्याप्रमाणें ह्या नाटकाची अखेरी झाली. आणखी

कांहीं प्रवेश वरील दुःखद देखाव्याचे मागून झाले. परंतु ह्या नाटकांतील मुख्य नायिका जी कुमारी कृष्णाबाई तिचा तर अंत झाला; तेव्हां हें एकंदर शोकपर्यवसानी नाटक लवकरच संपविलें पाहिजे.

कृष्णाकुमारीचा शेवट झाल्यानंतर लवकरच तिच्या दीन आणि अभागी मातेचाही शेवट झाला! प्रिय कन्येचा अशा दुष्ट रीतीनें घात झालेला पाहून तिनें अन्न वर्ज्य केलें. ती लवकरच अस्थिपंजरावशिष्ट झाली; आणि पुढें थोडक्याच दिवसांनीं ती आपल्या कन्येच्या भेटीस गेली! कृष्णाकुमारीचें मरण ऐकून कोणाच्याही डोळ्यांतून पाणी निघाल्यावांचून राहिलें नाहीं. जेव्हां अजितसिंगानें अमीरखानास जाऊन कळविलें कीं, 'तुमचा बेत सिद्धीस नेला;' तेव्हां तो खान पाषाणहृदयाचा, दुष्ट व क्रूर असतांही त्यास वाईट वाटून, त्यानें अजितसिंगाचा धिक्कार केला; आणि त्याची निर्भर्त्सना करून, 'नीघ माझे जवळून! तोंड दाखवूं नकोस! रजपुतांचें हेंच काय कर्म आणि हेंच काय शौर्य!' असें त्यास तो लावून बोलला. परंतु अजितसिंगास त्याजबद्दलचीही लाज कोठून असणार? कृष्णाकुमारीच्या घातानंतर चार दिवसांनींच संग्रामसिंग सुक्तावत उदेपुरास आला. संग्रामसिंग ह्मणजे फारच शूर, प्रामाणिक आणि स्पष्टवक्ता असे. तो प्रसंगीं आपल्या राजाचें पाणी ठेवणारा नसे व शत्रूलाही जुमानणारा नसे. खऱ्या मार्गानें चालण्यास तो कधीं व कोणास ह्मणून भीत नसे. तो एकदम राण्याचे कचेरींत शिरला; तों तेथें अजितसिंग त्याचे दृष्टीस पडला. त्याला पाहिल्याबरोबर त्याचे अंगाची अगदीं आग होऊन त्यानें तोंडाचा पट्टा सोडला. तो संतापून अजितसिंगाला ह्मणाला, 'अरे नराधमा! नीचा! कुलांगारा! सिसोदिया कुळाचे नांवावर आज तूं निखालस धूळ टाकून त्या नांवाची मृत्तिका केलीस! आज शंभर वर्षेपर्यंत ह्या कुलानें कसकशा दैना व आपत्ति सोसून आपलें नांव कायम राखिलें; त्या पवित्र नांवास तूं आज कलंक लाविलास! तुला धिक्कार असो! तुझा सत्यानाश होवो! ह्या महाघोर पातकाचें फल तुला भोगल्यावांचून तुझी सुटका नाहीं. तें तुला भोंवेल आणि इतरांनाही भोंवावयास राहणार नाहीं! रजपुतांचें वैभव आज लयास गेलें! आणि त्यांच्या शौर्यवीर्याचा आज शेवट झाला! बाप्पा रावळाचा वंश आज निर्मूल झाला! सर्व रजपूत जातीचा सत्यानाश होण्याचा दुष्ट समय अगदीं संनिध आला आहे; असें ह्या महानर्थानें सूचित केलें!' संग्रामसिंगानें हें सर्व भाषण राणा भीमसिंग याचे देखतांच केलें व तें सर्व त्यानें खालीं मान घालून ऐकून घेतलें. संग्रामसिंगाचें बोलणें होईपर्यंत त्यानें आपला सलज्ज व दुःखी चेहरा आपल्या हाताखालीं झांकून घेतला होता. संग्रामाचें बोलणें ऐकून त्याच्याही जीवाचा संताप

झाला व तोही अजितसिंगास ह्मणाला, 'तूं रजपूतबीजाचाच नव्हेस ! सिसोदिया कुळामध्यें तूं केवळ कुलांगार आहेस ! आह्मां सर्वांना तूं लाज आणिलीस; त्या तुझ्या तोंडांत माती पडो ! तुझें निःसंतान होवो व तुझा निर्वंश होवो ! तूं अशी ह्या कामांत घाई कां केलीस ? पठाणानें काय हें शहर उद्वस्त पाडण्याची सुरुवात केली होती ? त्याणें काय आपल्या जनानखान्यावर हल्ला करून भ्रष्टाकार मांडला होता ? आणि जरी तसें त्यानें केलें असतें तरी रजपुतांचे ब्रीदाप्रमाणें आणि आजपर्यंत जसे तुझे पूर्वज आपले जीव धारातीर्थी बळि देऊन आपलें पावित्र्य रक्षण करीत आले त्याप्रमाणें तुला करितां आलें नसतें काय? तुझे पूर्वजांनीं तुझेसारखीं नीचपणाचीं कृत्यें करून आपलें नांव केलें काय ? आणि अशा प्रकारच्या कृत्यांनींच आपलें नांव झालें आहे काय? आपल्याहून बलिष्ठ शत्रूंना भिऊन त्यांनीं अशीं भेकडपणाचीं कामें केलीं आहेत काय ? चितोड शहरीं घडलेल्या गोष्टी तूं विसरलास काय ? पण मी हें कोणाशीं बोलतों आहें ? रजपुताशीं नव्हे ! तुला आपल्या रजपुत स्त्रियांची अब्रू व मान हीं भ्रष्ट होण्याच्या बेतांत आलीं असें वाटून व त्या सर्वांची कत्तल करून, तूं जोहाराचे व्रतानें हातीं समशेर घेऊन बाहेर पडला असतास तर तेणेंकरून तुझी कीर्ति अजरामर झाली असती; व तेणेंकरून बाप्पा रावळाचे पश्चात् रजपुतांचें खरें बीज अंशतः तरी देवानें कायम राखल्यासारखें सर्व जगास समजलें असतें ! पण, अशापैकीं कांहीं एक कृत्य न करितां, जगामध्यें आपलें हंसें आणि अपकीर्ति मात्र तूं करून घेतलीस ! आपल्यावर कांहीं दुष्ट प्रसंग येणार आहे त्याची देखील तूं वाट बघितली नाहींस? तुझ्या परमावधीच्या भेकडपणानें तूं असें हें लाजिरवाणें काम केलेंस ! नाहीं तर तूं आपल्या राजाकरितां आपलें रक्तसिंचन केलें असतेंस. तुझ्या जीवाची तुला भीति असून तूं असला फसवणुकीचा धंदा केला नसतास तर, जो बळि देऊन तूं येणाऱ्या अरिष्टाची निष्कृति केलीस असें तुला वाटतें, त्या थोर आणि सर्व जगाला दुःखव्याप्त करून टाकणाऱ्या बळीपेक्षां अल्पस्वल्प बळिदानानें देखील तुझा कार्यभाग होता, नाहीं असें नाहीं. सारांश, आपल्या जातीचा व वैभवैश्वर्याचा अंत अगदींच जवळ आला आहे, ह्यांत संशय नाहीं !' ह्या बोलण्यावर अजितसिंगानें कांहीं एक उत्तर केलें नाहीं. त्याला उत्तर करण्यास मुळींच तोंड नव्हतें. संग्रामसिंग ह्या दुष्ट व नीच कृत्यामुळें अतिशय संतापून, त्यानें राण्याला आणि अजितसिंग वगैरे जे अधम लोक ह्या कृत्यास मूळ प्रवृत्त झाले त्यांना शाप दिले. तो संग्रामसिंग पुढें लवकरच मेला. परंतु त्याचे शाप आणि त्याचीं भविष्यें अगदीं खरीं झालीं. राणा भीमसिंग यास मुली आणि मुलगे मिळून एकंदर ९५ मुलें होतीं. परंतु तीं सर्व मरून एक मुलगा आणि दोन मुली अशीं

तीन मुलें मात्र त्याचे पश्चात् राहिलीं. त्यांत मुलगा जो होता तो कृष्णाकुमारीचा सख्खा भाऊ होता. त्याचें नांव जवानसिंग. आणि दोन मुली होत्या त्या दुसऱ्या एका राणीपासून झालेल्या होत्या. त्या जसलमीर आणि बिकानीर येथील राजपुत्रांस दिल्या होत्या. त्या दोन्ही संस्थानच्या कायद्याप्रमाणें मुलीच्या वारसाकडे सर्व राज्याधिकार आणि मानसन्मान जावयाचा असा ठराव आहे. राण्याची सर्व आशा आपल्या एकुलत्या एक जवानसिंग पुत्रावर होती. परंतु त्याला शेवटपर्यंत त्याचे देखतां कांहीं संतति झाली नाहीं. जवानसिंगानें चार बायका केल्या होत्या. तरी त्याला फार दिवस मूल झालें नाहीं. पुढें, त्याच्या शेवटच्या बायकोला—रेव्याचे राजकन्येला—एक मुलगा झाला. रेव्याची राजकन्या रजपुतांतील भागेला नांवाच्या शाखेपैकीं होती.

जवानसिंगाचा थोरला भाऊ उमरावसिंग दोन वर्षांपूर्वी वारला होता. तो जर ह्या वेळीं जिवंत असता तर तो तिसरा उमराव झाला असता. अजितसिंगाची पुढें काय दशा झाली ती बघा. त्याला चोहोंकडून मिळालेले शाप लवकरच फळास आले. एक महिन्याचे आंतच त्याची बायको आणि दोन मुलगे वारले. आणि तेव्हांपासून तो जराग्रस्त होऊन, तीर्थोतीर्थी आणि देवळोंदेवळीं हिंडून भ्रमिष्टासारखा फिरूं लागला; व तो हातांत जपमाळ घेऊन 'राम! राम!' ह्या शब्दांचा घोष करूं लागला. त्याचे तोंडावर कोणत्याही प्रकारची कळा व तेज न राहिल्यामुळें तो सर्व प्रकारें ऐहिक सुखाशेपासून मुकला, असें पाहणारांस दिसूं लागलें. त्याचें हृदय सर्वदा भीतीनें व्याप्त असलेलें त्याला भासूं लागलें; व आपण मोठें पापकृत्य केलें असें त्यास वाटून तो जन्माचा भ्रांतिष्ट झाला. असो. अजितसिंगाविषयीं आतां पुरे. त्याच्या

१. राजपुत्र जवानसिंग याला एकदां एकाएकीं पटकीचा वाखा झाला; व त्यांतही विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, उदेपुरामध्यें पहिल्यानेंच त्याजवर त्या घातुक रोगाची धाड आली! तेव्हां सर्व उदेपूर शहर चिंताक्रांत झालें होतें. हा ग्रंथ लिहिणारा कर्नल टॉड् ह्मणतो, 'राजपुत्र जवानसिंग याचे या दुखण्यांत मी त्याचे बिछान्याजवळून अगदीं हललों नाहीं. जवानसिंग या दुखण्यानें अगदीं हलक होऊन त्याला ग्लानि आली; व त्या ग्लानीनें त्याला पुष्कळ वेळ झोंप लागली. पुढें त्या झोंपेंतून तो जागा झाल्यावर त्यानें जे मजविषयीं आश्चर्याचे उद्गार काढले ते मी कधींही विसरणार नाहीं.' पुढें त्या दुखण्यांतून राजपुत्राला आराम पडला. परंतु राजपुत्र जवानसिंग बरा झाल्यावर त्याचा मुख्य मंत्री आणि व्यवस्थापक शिरजी मेहेता ह्मणून होता त्याला पटकीनें गांठलें. आणि, बारा तासांच्या आंतच त्याचा अंत होऊन, त्याची राख उदेपूरच्या आर नांवाच्या ओढ्याचे वाळवंटावर पडून, तें वाळवंट पांढरें दिसूं लागलें! टॉड् ह्मणतो, 'हा शिरजी मेहेता मोठा थट्टेखोर आणि विनोदी असे. पटकीच्या मनांत असतें तर आह्मीं तिला शिरजी मेहेत्याचे ऐवजीं दुसरा कोणी मनुष्य दिला असता.' शिरजी मेहेता हा मोठा कारस्थाननिपुण आणि अंबाजीच्या शिक्षणांतील होता.

दुष्कृत्याचीं फळें त्यास देवानें ह्याच लोकीं दिलीं. त्याचेविषयीं संग्रामसिंगानें जे रागाचे उद्गार काढले तेच आपण येथें घेऊन त्याच्या इतिहासाची पूर्णता करूं. 'त्याचे तोंडांत माती पडो!' असा संग्रामसिंगानें त्यास शाप दिला होता; व त्याचप्रमाणें शेवटीं अनुभव आला[1]. अजितसिंगाच्या पापी देहावर पवित्र गंगानदीचें सर्व उदक घातलें असतें तरी, सुंदरी कृष्णाकुमारी इच्या वधामुळें घडलेली हत्या दूर व्हावयाची नव्हती.

कृष्णाकुमारीचे वधाच्या दुष्ट कटांतला दुसरा पापपुरुष जो अमीरखान[2] त्याशीं इंग्रजांनीं तह करून त्याचें संरक्षण केलें. ह्या दुष्टाच्या नांवानें राजस्थानांत प्रत्येक घरीं रडत आहेत व त्याला शाप देत आहेत. त्यानें अवघ्या मेवाडाला अशौच आणिलें! असा हा अत्यंत पापकर्मा आणि दुरात्मा असून इंग्रजांचे आश्रयानें तो स्वस्थ होता. त्याचें शौर्य ह्मटलें ह्मणजे साधारण शिपायापेक्षां कांहीं जास्त नव्हतें. परंतु त्याशीं इंग्रजांनीं बोलणें लावून, त्यांना त्यास मराठ्यांचे पक्षांतून काढावयाचें होतें. आणि ह्मणून, इंग्रजांनीं त्यास सांगितलें कीं, 'तूं होळकराचा पक्ष सोडशील तर तुला आह्मी सिरोंज, टोंक, रामपुरा आणि निंबहेरा हे प्रांत देऊं.' आणि ह्या लोभानें तो घातुक व विश्वासघातकी अमीरखान एके दिवशीं एकटाच होळकराकडून निघून इंग्रजांचे गोटांत येऊन त्यांस मिळाला. अमीरखानास विश्वासघात करण्याची मुळींच क्षिति वाटत नसे. आणि अशा मनुष्यास इंग्रजांनीं मोठा मुलूख देऊन त्याला आपला हस्तक केलें, हें त्यांचें सुदैवच ह्मटलें पाहिजे. अमीरखानाशीं इंग्रजांची लढाई होणार होती. व तो होळकराचे पक्षानें इंग्रजांशीं लढाई करणार होता. त्याजवर इंग्रजांची फौजही गेली होती व तोही इंग्रजांचे सरदाराबरोबर सामन्यास उभा होता. ह्या इंग्रज सरदाराचें नांव ब्रिगेडियर-जनरल अलेग्झ्यांडर नॉक्स असें होतें. समरांगणीं दोघेही समोरासमोर उभे राहिल्यावर नॉक्स साहेबानें अमीरखानास सांगून पाठविलें कीं, 'अर्ध्या तासांत जर तूं आह्मांकडे येऊन मिळशील तर आह्मी तुझा सर्व प्रकारचा इतबार आणि सन्मान ठेवूं.' इंग्रज सरदाराचा हा निरोप ऐकून त्यानें त्याविषयीं आपल्या हाताखालचा जमशिद नांवाचा मनुष्य होता त्याचा अभिप्राय घेतला. जमशिद हाही अमीरखानाचे ब-

---

१. अजितसिंगानें पुढें चोंडावतांच्या तर्फे उदेपुरांत कांहीं खटपट चालवून आपल्या पूर्वीच्या पापकृत्यांचा लोकांना विसर पाडण्याचा यत्न चालविला होता. परंतु, त्याचा घातुक स्वभाव लोक पुरा ओळखून होते. व शेवटीं त्यास इंग्रजांनीं तेथून हद्दपार करून काशींत ठेविलें होतें. तेथें तो पलितमौन्हि होत्साता गंगेच्या घांटावर पुष्कळ दिवस लोकांच्या दृष्टीस पडत असे. अखेरीस काशीक्षेत्रांतच त्याचा अंत झाला.

२. सांप्रतच्या टोंकसंस्थानच्या नबाबाचा मूळ पुरुष.

रोबरीचाच घातुक आणि विश्वासघातकी होता. त्याणें अमीरखानास आपलें मत दिलें कीं, 'समजुतदारपणा हा एक आपल्या शौर्याचा व पराक्रमाचा भागच आहे!' आणि, अशा समजुतीनें त्यानें अमीरखानास होळकराचा पक्ष सोडून इंग्रजांना मिळण्याविषयीं आपली संमति दर्शविली. तेव्हां मग, वर लिहिल्याप्रमाणें, अमीरखान हा एकटाच होळकराकडून निघून इंग्रजांस जाऊन मिळाला; आणि पुढें त्याच्या जन्माचें कल्याण झालें. राजस्थानांतले सर्व राजे पुढें इंग्रजांचे ताब्यांत आले; आणि त्यांच्या एकंदर दरबारांत हा इंग्रजांचा पक्षपाती अमीरखान हाही मोठ्या राजरोसपणानें, सर्वांत खालच्या जाग्यावर कां होईना, पण येऊन बसे! काय विलक्षण न्याय बघा! ज्यानें सर्व रजपूतघराण्यांत कृष्णाकुमारीच्या वधानें हाहाकार माजवून दिला, तोच महादुष्ट व चांडालशिरोमणि अमीरखान, त्याच दुःखाक्रांत झालेल्या रजपूत राजदरबारांत, इंग्रजांचे साह्यानें, तें आपलें काळें तोंड घेऊन उजळमाथ्यानें खुशाल आणि निर्लज्जपणं येऊन बसूं लागला! अमीरखान अशा रीतीनें जरी व्यवहारांत निर्भयपणें आणि बिनदिक्कत हिंडे फिरे, तरी, एकांतीं व सुखाचे वेळीं, आपण मोठे नराधम आणि पापी पुरुष आहोंत, असें त्यास वाटल्याशिवाय राहत नसे. कृष्णाकुमारीचा घात करून आपण भयंकर पापकृत्य केलें असें त्याला वाटल्याशिवाय रहात नसे. असो. आतां त्याचेविषयींही आपण, संग्रामसिंगानें जे उद्गार काढून त्यास शापित केलें तेच उद्गार उच्चारून, त्याचा इतिहास पुरा करावा ह्मणजे झालें. संग्रामसिंगानें ह्मटलें आहे कीं, 'अशा क्रूर हृदयाचे अमीरखानाच्या तोंडांत माती पडो!' आणि तसेंच व्हावें अशी सर्वांची इच्छाही होती खरीच!

इ० स० १८०६ च्या उन्हाळ्यांत इंग्रजांचा मेवाडांत प्रवेश झाला. पूर्वीं मेवाडप्रांत ह्मणजे उत्तम आणि सुपीक ह्मणून प्रसिद्ध होता. तेथील संपत्ति आणि ऐश्वर्य यांचें दर्शन, तेथील मोठमोठ्या हवेल्या, राजवाडे आणि इतर देखावे यांजवरून सहज होत होतें. परंतु ह्यावेळीं तो सर्व प्रांत उजाड दिसत होता! सर्व प्रांतांतली वस्ती उद्ध्वस्त होऊन मोठमोठीं शहरें अरण्यवत् झालीं होतीं; आणि घरें व वाडे मोडकळीस येऊन, शेतें व बागा वगैरे नापीक होऊन रूक्ष बनलीं होतीं. मराठ्यांचा जेथें जेथें प्रवेश होई तेथें तेथें असा प्रकार व्हावयाचाच असा नियम होता. जो अतिशय भरभराटीचा मुलूख असेल तो सर्व उद्ध्वस्त करून त्याचें रान बनविण्यास आणि त्याजवरून नांगर फिरविण्यास मराठ्यांना एक अहोरात्र पुरी होत असे! मराठ्यांची स्वारी अमुक प्रांतांतून गेली हें त्या मुलखांतील बाह्य देखाव्यावरून ताबडतोब कोणासही समजत असे. मराठ्यांचा फेरा जिकडून गेला तिकडे सर्व खेडींपाडीं जळून त्यांची रक्षा झालेली आणि शेतांभातांची नासाडी व तुडवातुडव केलेली दृष्टीस

पडावयाची, हा नियम असे. अशा रीतीनें लुटालूट करून मिळविलेल्या पैशाची तरी योग्य व्यवस्था लागत असे असें नाहींच. अन्यायोपार्जित द्रव्याची पुढें तशींच वाताहत होऊन, असलीं अमानुष कृत्यें करणारांस योग्य तें फळ मिळाल्याचीं उदाहरणें त्या वेळच्या इतिहासांत सांपडतात; ही एक समाधानाची गोष्ट आहे. अंबाजी इंगळा यानें मेवाड धुऊन व सावडून जी अतोनात संपत्ति मिळविली तिचा त्याला कितीसा उपयोग झाला ? शिंद्यानें त्याजपासून त्यानें मिळविलेली सर्व संपत्ति हिसकून घेतली; व पुढें त्याचे बहुत हालहाल केले. ते सर्व हाल अंबाजीच्या एकंदर वर्तनाकडे बघितलें असतां अगदीं योग्यच होते. मेवाडप्रांताला अंबाजीनें अतिशय छळलें होतें व त्याबद्दलचें त्याचें उट्टें पुढें लवकरच निघालें. अंबाजी तर आपल्याला स्वतंत्र शिंदाच ह्मणवीत असे. व त्यानें ग्वाल्हेरशहरांत व त्याचे आसपास आपल्या स्वातंत्र्याचें बरेंच प्रस्थ माजविलें होतें. हें पाहून शिंद्यानें त्याचा भरदरबारांत अतिशय अपमान केला. वस्तुतः अंबाजी हा शिंद्याचा अंकित व नौकर; असें असतांना तो आपलाच वर्चष्मा मिरवूं लागून शिंद्याच्या अधिकारयोग्यतेस हीनत्व आणण्याचा प्रयत्न करीत होता. तें शिंद्यास समजल्याबरोबर यानें त्याबद्दल त्याचा चांगलाच समाचार घेतला. त्यानें त्याचे हातांत बेडी ठोकून त्याला एका लहानशा व भिकारड्या तंबूत अडकवून टाकिले. व पुढें त्यानें मेवाड लुटून आणलेला सर्व पैसा द्यावा ह्मणून त्याचे हातांच्या बोटांस व अंगास जळते कांकडे लावून, त्याला पुष्कळ मारलें व त्याचा पुष्कळ छळ केला. परंतु अंबाजी हा अत्यंत द्रव्यलोभी असल्यामुळें, मिळविलेला पैसा शिंद्याला न देण्याचा त्याचा निश्चय होता. पण शिंद्याकडून तर अतिशय हालअपेष्टा होऊं लागल्या. तेव्हां तो जाच चुकवावा ह्मणून, त्यानें एके वेळेस आत्मघात करण्याचाही विचार केला. त्याचे जवळ एक चाकू होता त्यानें आपला गळा कापून घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु तो सफळ झाला नाहीं. त्याचे गळ्याला नुस्त्या जखमा मात्र झाल्या. त्या जखमा इंग्रजी वकिलाबरोबर असलेल्या शस्त्रवैद्यानें शिवल्या. तरी त्याचा छल शिंद्याकडून चाललाच होता. असें झालें तेव्हां मात्र त्याच्या संदुकीच्या किल्ल्या शिंद्याला सहज मिळाल्या. ती संदूक उघडून बघतां तींत ५५ लाख रुपये शिंद्याला सांपडले ! इतका अंबाजी इंगळा द्रव्यलोभी होता. त्यानें आपला छल विनाकारण करून घेतला. पुढें शिंद्यानें पुनः मेवाडांत त्यास आपल्या तर्फें मुखत्यार नेमिलें; परंतु ती मुखत्यारी मिळाल्यानंतर तो लवकरच मेला. ह्याप्रमाणें, अंबाजी इंगळ्यानें राजस्थानच्या लोकांवर अतिशय जुलूम करून जो हरामाचा पैसा कमाविला होता तो अशा रीतीनें गेला, त्याचें कांहीं द्रव्य त्याचा परम मित्र ह्मणवणारा जो झालिमसिंग त्यानेंही लांबविलें, असें

ह्मणतात. व झालिमसिंगाला तरी त्याशीं असें कपट करण्याचें कारण इतकेंच कीं, संवत् १८४८ सालीं अंबाजीनें जें त्याशीं कपटाचें वर्तन केलें त्याचें प्रायश्चित्त त्याला देण्याचा त्यानें हा विचार केला होता. व त्याप्रमाणें त्यानें अंबाजी इंगळ्याचा कांहीं घातपात न करितां त्याला जाणवेल असें योग्य शासन करून त्याचा सूड उगवला. हा तरी झालिमसिंगाचा एक प्रकारें कारस्थानीपणाच होय असें ह्मटलें पाहिजे.

शिंद्याचा सासरा त्याच्या लष्करांत होता. परंतु, तो कांहीं कुलंगडीं उत्पन्न करणारा असल्यामुळें शिंद्याचा व इंग्रजांचा जेव्हां तह झाला तेव्हां, त्यास शिंद्यानें आपल्या लष्करांतून काढून टाकलें. मग तो आपल्याला राण्याचा दिवाण ह्मणवून घेत होता व तो राण्याच्या आश्रयाला राहिला होता. तो हा आश्रय करून होता खरा; परंतु त्या आश्रयांत त्यानें राण्याच्या दरबारांतले वसूलजमाबंदीच्या संबंधाचे कित्येक महत्वाचे कागदपत्र उपटले. त्यांचा त्यानें राण्याला पत्ताच लागूं दिला नाहीं. मनुष्याचें वर्तन तरी बघा कसें नीचपणाचें होत जातें तें !

यशवंतरावभाऊ होळकर याजकडून सतीदास दिवाण यानें कुमळमेर किल्ला व त्याचे भोंवतालचा प्रांत ७० हजार रुपयांस सोडवून घेतला; व होळकरानें तो प्रांत सतीदासाचे नांवें करून दिला; आणि सतीदासानें त्याचा ताबा आपणाकडे घेतला. मीरखानें यानें इ० स० १८०९ ह्या वर्षी आपले पेंढारी घेऊन उदेपुरावर स्वारी केली. व त्यानें राण्याला कळविलें कीं, '११ लाख रुपये द्याल तर मी तुमचे प्रांतास कांहींएक उपद्रव न देतां स्वस्थपणानें निघून[१] जाईन. नाहींतर तुमचें एकलिंगाचें देऊळ फोडून त्याची वाताहत करीन.' पुढें राण्यानें त्याची पुष्कळ मिनतमाना करून ९ लाख रुपयांवर त्यानें खुष होऊन जावें असें ठरविलें. परंतु हे ९ लाख रुपये तरी आणावयाचे कोठून ? राण्याचे जवळ तर कांहीं शिल्लक नव्हती. ह्याप्रमाणें राण्याकडून ९ लाख रुपयेसुद्धां वसूल होत नाहींत असें त्या पेंढाऱ्यानें बघितलें तेव्हां, त्यानें राण्याच्या वकील वगैरे लोकांचा छल करण्यास आरंभ केला. त्यांत त्यानें किसनदासे[२] यास तर जखमी केलें. नंतर त्यानें उदेपूरच्या बाऱ्या फोडून, तो

---

१. हा राक्षसी स्वभावाचा पेंढारी, पुढें त्याचेपासून मेवाडप्रांताची सुटका केल्यानंतर, लौकरच त्याचे पाठीवर झालेल्या काळपुळीच्या आजारानें मेला.

२. किसनदासाचे संबंधानें टॉड् असें ह्मणतो कीं, 'राण्याचा व इंग्रजांचा तह होऊन त्यांचें परस्पर ऐक्य व स्नेह करून देण्याचे कामांत हाच मुख्य होता. तो जरी चोंडावतांचा पक्षपाती होता तरी तो राजभक्त व राजनिष्ठ असून प्रामाणिक सेवक होता. किसनदासाचा अंत माझे देखतांच झाला. त्याविषयीं माझें व माझ्या डाक्टराचें असें मत आहे कीं, तो आपल्या मरणानें मेला

दोबारीनें व त्याचा सोबती व जांवई जो प्रख्यात पेंढारी जमशीद तो चिरवाघाटानें शहरांत शिरला. त्यांस ह्मणण्यासारखा कोणाचा अडथळा झाला नाहीं. हे लुटारू पेंढारी पठाण शहरांत शिरल्यावर त्यांनीं राण्याचा फार अपमान केला, आणि जमशीद हा तर राण्याचे वाड्याजवळ त्यानें कबूल केलेला पैसा त्याजकडून वसूल करण्यासाठीं आपल्या कडवे आणि दुष्ट रोहिले लोकांस तगाद्याला बसवून चालता झाला. पुढें त्या रोहिल्यांनीं उदेपुरास जो अनर्थ मांडिला त्याचें प्रत्यक्ष दर्शन त्या मोडकळीस आलेल्या शहरांतील अवशिष्ट असलेल्या कित्येक भागांवरून सहज होत आहे! ते जोंपर्यंत उदेपुरांत होते तोंपर्यंत, एकही स्त्री किंवा पुरुष उघडपणें रस्त्यांतून गेलीं नाहींत. स्त्री बघितली कीं, ते तिचेवर जुलूम करून तिचे दागिने लुबाडीत; आणि पुरुषाचें उगेंच कोठें पागोटें दृष्टीस पडलें कीं, त्याजवर त्यांनीं झडप घालून त्याजपासून कांहीं तरी निघेल ह्मणून त्याचे यथेच्छ हाल करावे; असा त्यांचा क्रम चालला होता!

वि० सं० १८६७ ह्मणजे इ० स० १८११ ह्या वर्षी बापू शिंदा ह्यास 'सुभेदार' ही पदवी देऊन मेवाडास पाठविण्यांत आलें. व त्याप्रमाणें त्यानें येऊन उदेपूरच्या बारीमध्यें तळ दिला. ह्याप्रमाणें, इ० स० १८११ पासून ते १८१४ पर्यंत उदेपुरावर एकीकडून शिंदा आणि दुसरीकडून अमीरखान ह्या दोघां राक्षसी पुरुषांचा पाहरा होता. येवढ्या मुदतींत त्या दोघांनीं आपला अंमल बराच बसविला. उदेपूरदरबारच्या अमलांतले जहागिरदार, वतनदार वगैरे सर्व त्यांनीं आपल्या अमलांत आणल्यासारखें केलें. त्यांनीं कधीं कधीं मिळविलेल्या लुटीसाठीं आपल्याआपल्यांतच तंटेबखेडे माजवावे. असा क्रम चालू होता. पुढें त्यांनीं आपल्याआपल्यांतच असे तंटे वगैरे न करावे ह्मणून राण्यानें आपल्या तर्फेचे सतीदास, किसनदास आणि रूपराम असे तिघे मुखत्यार त्या दोघां लुटारूंची कांहीं तरी नीट व्यवस्था लावण्या-

नाहीं. त्यास विषप्रयोग होऊन तो मेला. तो अकस्मात् मेल्याची खबर जेव्हां बाहेर लोकांत पसरली तेव्हां हजारों लोक त्याचे घराभोंवतीं जमून त्यांनीं आपलें दुःख प्रदर्शित केलें. यावरून तो किती लोकप्रिय आणि परोपकारी होता हें समजेल.'

१. पेंढाऱ्यांच्या जुलमाचा अनुभव पुणें शहरास पूर्ण आहे. इ० स० १८०४ सालीं होळकराचें पेंढार पुण्यावर आलें, तो त्याचा मुक्काम पुढें दीड वर्षपर्यंत एकसारखा होता. तेवढ्या मुदतींत त्या पेंढाऱ्यांनीं पुण्याचे लोकांचा अतिशय छल केला. त्यांनीं स्त्रीपुरुषांस छळण्यास सोडिलें नाहीं ह्यांत आश्चर्य नाहीं; परंतु, त्यांनीं लहान मुलांस देखील छळण्यास सोडिलें नाहीं! लोकांवर होणारे त्यांचे जुलूम तर प्रसिद्धच आहेत. मिर्च्यांची धुरी, राखेचे तोबरे, तापलेल्या तव्यावर उभें करणें, इत्यादि व अशाच प्रकारचे दुसरे शतशः जुलूम आणि छल त्या पेंढाऱ्यांनीं पुण्याच्या लोकांचे केले, ते इकडे प्रसिद्ध आहेतच. पण त्यांचें आतां स्मरण देखील नको!

साठीं पाठवून दिले. तेव्हां, त्या उभयपक्षांच्या लोकांची धवल मुग्रा (पांढरी टेंकडी) येथें एक सभा भरली; व त्यांच्यामध्यें करार होऊन त्यांच्या हद्दी ठरल्या; आणि त्यामुळें, त्या हद्दींमध्यें प्रत्येकानें केलेल्या लुटींच्या संबंधानें एकमेकांशीं भांडण्याचें कारण राहिलें नाहीं. उदेपूर शहर तर बहुतकरून ओसाड पडलें होतें. तरी, त्यांत जी कांहीं वस्ती होती. तेवढ्यापुरतें तें शहर व त्याचे भोंवतालचीं खेडींपाडीं यांतील राहणाऱ्या लोकांची यादी केली. व त्या लोकांवर त्या पेंढाऱ्यांचे दोघां पुढाऱ्यांस सालीना कांहीं तरी रकम पोंचत जावी; ह्मणजे त्यांजकडून कोणत्याही प्रकारचा उपद्रव होऊं नये; असें ठरलें. त्याप्रमाणें प्रत्येकास ३॥–३॥ लाख रुपये देण्याचें ठरलें. परंतु हा ठराव पुढें अमलांत येण्याची मारामार पडली. कारण, लोकांना हा जुलूम सहन न होऊन हळू हळू उदेपूर शहर अगदींच उजाड होत चाललें. आणि त्याची पूर्वींची भरभराट व देखणेपणा हीं लवकरच अदृश्य झालीं. शेतकी पडून राहिली; गांवें ओस झालीं; लोक परागंदा झाले; सरदार व जहागिरदार अगदीं खालावून दरिद्री बनले; आणि खुद्द राणा व त्याचें कुटुंब निराधार होऊन, आपल्याला सुखाचा आश्रय व स्वस्थता तरी कशी मिळेल, ह्याची त्यांस मोठी फिकीर पडली. अशी एकंदर स्थिति होऊन गेली. बापू शिंदा[1] आणि जमशीद यांस त्यांच्या त्यांच्या हद्दी ठरवून दिल्या; तथापि, तेवढ्यानें शिंद्याचें समाधान झालें नाहीं. त्यानें वारंवार राण्याकडे आणखी पैसा देण्याविषयीं मागण्या पाठवाव्या. बापू शिंद्यानें तर मेवाडप्रांत अगदींच उजाड पाडण्याचा यत्न चालविला होता. त्यानें मेवाडचे सरदार, व्यापारी आणि शेतकरी या सर्वांस कैद करून अजमिरास नेऊन ठेविलें. आणि त्यांनीं चांगली खंडणी दिली नाहीं तर त्यांस सोडावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें. तेव्हां कित्येक खंडणी देण्यास न मिळाल्यामुळें व त्यांचा त्या कैदेंत अतिशय छल व उपासमार झाल्यामुळें कैदेंतच मेले. आणि कित्येक तर, सन १८१७ सालीं राजस्थानच्या एकंदर संस्थानिकांशीं इंग्रजांचा तह होईपर्यंत तसेच कैदेंत होते. इंग्रजांशीं तह झाल्यानंतर त्यांची सुटका झाली. एके कालीं राजस्थानानें

१. बापू शिंद्याला इंग्रजांशीं तह वगैरे झाल्यानंतर अजमिराहून हुसकून दिलें. तेव्हां तो, उत्तरेकडे कोठें तरी जाऊन राहण्यासाठीं, मेवाडांतून चालला असतां, तिकडील लोकांनीं, त्यानें त्यांना पूर्वीं लुटलें होतें ह्मणून, गोळी घालून ठार मारलें. टॉड् ह्मणतो, 'असें जरी झालें तरी, मी उदेपूरच्या दरबारांत असतांना तेथें कोणी येऊन राण्याला मुजरा करून कळविलें कीं, महाराज, बापू शिंदा पुन: उदेपूरच्या बारीवर आला आहे. तेव्हां ती बातमी दरबारानें ऐकिल्याबरोबर सर्वांना मोठी धास्ती पडली. परंतु मला बापू शिंद्याच्या वधाची बातमी माहीत असल्यामुळें मीं राण्याला कळविलें कीं, आतां पुन: बापू शिंद्याचे स्वारीची आपण भीति बाळगूं नये, असाच या हेराचे सांगण्याचा अर्थ आहे. हें ऐकून तो हेर हांसला व सर्व दरबाराला आनंद झाला।'

कोणत्या प्रकारचें स्वातंत्र्य व वैभव यांचें सुख भोगिलें; आणि त्याचें त्याच्या स्वातंत्र्यवैभवसुखाची आतां काय दशा झाली; हें ह्या भागावरून चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे. मेवाडदेश अगदीं हतवीर्य आणि अशक्त होऊन सर्वांशीं दुसऱ्याच्या आश्रयावर अवलंबून राहिला; असा विलक्षण प्रकारचा काल प्राप्त झाला !

---

## भाग सोळावा.

## लुटारू लोकांचा आणि पेंढाऱ्यांचा बंदोबस्त आणि मुलखाची आबादानी.

लुटारू लोकांचा आणि पेंढाऱ्यांचा बंदोबस्त.—इंग्रजांचा रजपूत संस्थानांशीं स्नेह.—मेवाडास इंग्रजी वकिलाची योजना.—तो उदेपुरास दाखल होतो.—त्याचें स्वागत.—उदेपूर दरबाराचें वर्णन.—राज्यस्थितीच्या संबंधानें मेवाडप्रदेशाचें वर्णन.—राणा.—त्याचें स्वभाववर्णन.—त्याचें मंत्रीमंडल.—त्यांचे बेत.—परागंदा झालेल्या लोकांस परत आणणें.—व्यापाऱ्यांना बोलावून आणणें.—भीलवाड्याची स्थापना.—सरदारांची सभा.—करारनाम्याची मंजुरी.—जमिनी व मुलूख परत मिळणें.—अर्धसंस्थानिकांच्या गोष्टी.—बेदनूर, भदेश्वर आणि अमाईत.—मेवाडांतील जमीदारीचा प्रकार.—गांवखात्याचे नियम.—मेवाडचा बापोता (मिरासदारी)—भोम्ये किंवा स्वतंत्र सरदार. त्यांच्याशीं असलेले करारमदार आणि त्यांचे हक्क.—फरमान्यांची दरबारी नोंद.—मेवाडावरील स्वामित्वाच्या संबंधानें पूर्वींपासून चालत आलेल्या दंतकथा.—पाटील, त्याचें मूळ आणि त्याचें कर्तव्य.—जमीनबाबीचे ठराव.—उपसंहार.

उदेपूरच्या राण्याचे वंशाचा एकंदर इतिहास, इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासून तों एकोणिसाव्या शतकापर्यंत, यथाक्रमानें, येथपर्यंत लिहीत आणिला; व त्यामध्यें एकंदर ज्या कांहीं फेरफारांच्या आणि वृद्धिक्षयादिकांच्या गोष्टी घडल्या, त्या सर्व खुलासेवार टिपण्यांत आल्या. मेवाडावर पार्थियन, भील, तार्तार, आणि सध्यां मराठे यांच्या एकामागून एक कसकशा स्वाऱ्या झाल्या, आणि शेवटीं तो सर्व प्रांत इंग्रजांच्या अमलाखालीं कसा मांडलिक झाला, हें सर्व कळविण्यांत आलें. नुकत्याच संपलेल्या पंधराव्या भागांत तर राजस्थानाच्या शोचनीय स्थितीची कमाल झाली; व सर्व देशाची एकंदर वाताहत होऊन, शूर रजपूत लोक अगदीं हतवीर्य झाले. सर्व प्रकारच्या खलबली व घालमेली होऊन, अखेरीस विश्रांतिशतकाचा उदय झाला. इतिहासामध्यें येवढ्या नांवालौकिकास चढलेल्या राजस्थानांत शेवटीं लुटालुटीचा इतका भयंकर प्रकार माजला कीं, तें सर्व राष्ट्र अगदीं दारिद्र्यग्रस्त आणि अशक्त होऊन इ० स० १८१७ सालीं, इवल्याशा मोहिमेनें तें एकदम इंग्रजांचे पूर्ण अमलाखालीं आलें. तेव्हां कालाचा प्रभाव कांहीं विलक्षण आहे! राजस्थानावर आपला कांहीं पगडा बसावा ह्मणून इ० स० १८०३ सालीं इंग्रजांचा विशेष प्रयत्न चालला

होता. परंतु त्या वेळीं त्यांस बिलकुल यश मिळालें नाहीं. यावरून राज्यक्रांतीची वेळ केव्हां आणि कशी येईल हें कांहीं सांगवत नाहीं. ही शेवटची मंद आणि सुस्त-पणानें चाललेली कारकीर्द इंग्रजांच्या चांगली पथ्यावर पडली. त्यांचा पूर्वदिशेकडे मजबूत पायावर अंमल बसला. आणि तेणेंकरून रजपुतांच्या अवशिष्ट ऐश्वर्याचा आणखी सत्यानाश होण्याचें बंद होऊन, त्यांना चांगली विश्रांति मिळाली व हा त्यांस मोठा फायदा झाला.

राजस्थानांत मराठ्यांनीं जो एकसारखा अविश्रांत लुटालुटीचा बंडावा माजविला होता, त्यापासून एकदांची सुटका करून घेण्याचें सर्वच रजपूत संस्थानिकांचे मनांत होतें; व त्या संबंधानें सर्वांचें ऐक्य होण्यांतच विशेष नफा होता. इंग्रजी वकिलांनीं ही संधि बघून सर्व रजपूत संस्थानिकांस व राजांस ह्या लुटालुटीच्या त्रासापासून मुक्त होण्याचा विचार करण्यासाठीं एकत्र जमण्याविषयीं आमंत्रण केलें. त्या आमंत्रणाव-रोबर, जयपूरच्या राजाशिवाय सर्व राजे व संस्थानिक इंग्रजी वकिलाचें तें आमंत्रण मान्य करून, त्याप्रमाणें एकत्र जमण्याचें ठरलें. व त्यांनीं आपआपल्या वतीचे व-कील दिल्ली येथें पाठविले. ही मोठी थोरली सभा दिल्ली तेथें भरविण्याचें ठरलें होतें. सभा भरल्यावर तेथें तहाचा मसुदा वाचून दाखविण्यांत आला. व तो स-र्वांना पसंत पडला. त्या तेहनाम्यांत सर्व संस्थानिकांचें अंतःस्वातंत्र्य कायम राखून,

---

१. **तहनामा**—नामदार इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनी आणि महाराणा भीमसिंग, उदेपूरचा राणा, यांचेमध्यें, तहनामा झाला. तो नामदार कंपनी सरकारचे हिंदुस्थानांतील प्रतिनिधि व गव्ह-र्नर जनरल मार्किस् ऑफ् हेस्टिंग्ज् यांचे मार्फत इंग्रजी वकील मि० चार्लस् थिऑफिलस् मेट-कॉफ् आणि महाराण्याचे तर्फे त्याचा मुखत्यार ठाकूर अजितसिंग ह्या दोघांच्या सह्यांनिशीं हो-ऊन, महाराण्याकडून सर्व प्रकारचे अधिकार इंग्रजांस देण्यांत आले. तो तहनामा पुढें लिहिल्या-प्रमाणें कलमवार आहे:—

" १.—इंग्रज आणि राणाजी यांचेमध्यें मैत्री, सख्य आणि ऐक्य हीं पिढीदरपिढी चालतील; "व एकाचे जे मित्र किंवा शत्रु ते दुसऱ्याचे मित्र किंवा शत्रु असें परस्परांनीं समजावें.

" २.—इंग्रज सरकार राण्याचें सर्व राज्य कायम राखील व त्यास उपद्रव पोहोंचूं देणार नाहीं.

" ३.—उदेपूरच्या महाराणाजींनीं इंग्रज सरकारचें अंकित असें नेहमीं राहून त्यास आपलेपेक्षां "वरिष्ठ समजावें. त्याचप्रमाणें, इतर सरदार किंवा संस्थानिक यांशीं महाराणाजींनीं कोणत्याही "प्रकारचा संबंध ठेवूं नये.

" ४.—इंग्रज सरकारच्या परवानगीशिवाय आणि मंजुरीशिवाय महाराणाजींनीं कोणत्याही स-"रदाराशीं किंवा संस्थानिकाशीं तह वगैरे बोलणें आणि राजकीय दळणवळण ठेवूं नये. साधारण "नेहमींचीं स्नेहकुशलतेचीं पत्रें वगैरे लिहिण्यास मात्र हरकत नाहीं.

" ५.—महाराणाजींनीं कोणत्याही राजावर स्वारी करूं नये. कांहीं तक्रार उभी राहिली तर "त्याचा विचार व निकाल इंग्रज सरकाराकडून होईल.

त्यांचें बाह्योपाधींपासून व परचक्रादिकांपासून इंग्रजांनीं रक्षण करावें; आणि, इंग्रजांच्या ह्या मित्रत्वाचे कामासाठीं सर्व रजपूत राजांनीं व संस्थानिकांनीं इंग्रजांना आपल्याकडून थोडा थोडा पैसा द्यावा व त्यांच्याकडे आपल्यापेक्षां श्रेष्ठत्व राखावें इतकें झालें. ह्या तहनामा होऊन सर्व रजपूत संस्थानें एकदिलाचीं व विचाराचीं झाल्यामुळें, पुढें थोडेच आठवड्यांनीं सर्व राजस्थान जणूं काय एकछत्री राज्य बनलें. आणि असें तें एकछत्री राज्य केवळ इंग्रजांचे अंकित झाल्यामुळें, हिंदुस्थानांत इंग्रजांच्या अमलाचा पाया विशेष मजबूत झाल्यासारखा झाला. इंग्रजांनींही, ज्या अर्थी आपल्यावर ह्या लोकांनीं विश्वास ठेविला त्या अर्थी त्यांचा आपल्यावर गैरभरंवसा न होतां, त्यांची भरभराट होऊन त्यांना सौख्य मिळावें, याकडे विशेष लक्ष देऊन,

---

" ६.—पांच वर्षेपर्यंत उदेपूरच्या वसुलाची चौथाई इंग्रज सरकारास खंडणी ह्मणून द्यावी. आणि "त्या मुदतीनंतर तीन-अष्टमांश हिस्सा उदेपूरच्या वसुलांतून महाराणाजींनी नेहमीं इंग्रज सरका-"रास दिला पाहिजे. महाराणाजींवर दुसऱ्या कोणाही सरकारची खंडणी वगैरे असावयाची नाहीं. "आणि असेल तर त्याबद्दलचा जाब इंग्रज सरकार देईल.

" ७.—उदेपूरच्या अमलाखालील मुलूख कित्येक लोकांनी गैरवाजवी रीतीनें आणि अन्यायानें "घेतला आहे तो परत मिळवून द्यावा, असें महाराणाजीचें ह्मणणें आहे. परंतु महाराणाजींच्या ह्म-"णण्याप्रमाणें खरी माहिती इंग्रज सरकारास तूर्त नाही. ह्मणून त्याबद्दलचें आतांच वचन देतां येत "नाहीं. तरी, राण्याचें जिकडून हित होईल तिकडून पाहणे, हें आपले कर्तव्य आहे, असें इंग्रज "सरकार समजतें. आणि ह्यासाठीं, महाराणाजीच्या ह्मणण्याप्रमाणें प्रत्येक गोष्टीच्या संबंधानें योग्य "रीतीचा तपास करून, ज्या गोष्टी घडून आणण्यासारख्या असतील. त्या घडून आणण्यास हयगय "होणार नाहीं. महाराणाजीना त्यांचा जो जो मुलूख इंग्रज सरकारचे मदतीनें परत मिळवून दे-"ण्यांत येईल त्या त्या मुलखांतूनही महाराणाजीनी तीन-अष्टमांश हिस्सा इंग्रज सरकारास नेहमी "दिला पाहिजे.

" ८.—उदेपूरच्या फौजेतील लोक, इंग्रज सरकारास जेव्हां जेव्हां लागतील तेव्हां तेव्हां "महाराणाजीच्या सोयीप्रमाणे देण्यात आले पाहिजेत.

" ९.—उदेपूरच्या राज्यांत महाराणाजीचाच हुकूम आणि अखत्यार पूर्णपणें चालेल. इंग्रज "सरकाराकडून अंमलबजावणी आणि मुखत्यारी चालविण्यांत येणार नाहीं. आणि,

" १०.—हा दहा कलमांचा तहनामा दिल्ली मुक्कामीं कायम झाला. ह्या तहनाम्यावर इंग्रज सरका-"रच्या तर्फे मि० चार्लस् थिऑफिलस् मेटकॉफ् आणि महाराणाजींच्या तर्फे ठाकूर अजितसिंग बहादूर "यांचे अनुक्रमें सह्या व शिक्के झाले आहेत. ह्याबद्दलची मंजुरी नेकनामदार गव्हर्नर जनरल आणि "महाराणा भीमसिंगजी यांजकडून अनुक्रमें मिळाली ह्मणजे एक महिन्याचे आंत हे तहनामे पर-"स्परांचे स्वाधीन करावे. मुक्काम दिल्ली, ता० १३ माहे जानेवारी इ० स० १८१८."

"(सही) सी. टी. मेटकॉफ्.
" (सही) ठाकूर अजितसिंग."

त्यांनीं आपला प्रामाणिकपणा व आपल्यावरील त्या लोकांचा विश्वास कायम ठेविला. आणि, त्यामुळें, इंग्रजी अमलावर राजस्थानाचे बाजूकडून कोणा परकीयांची स्वारी होण्याची मुळींच भीति राहिली नाहीं. असा इंग्रजांचा अंमल निर्भेद्य व कायम झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

हिंदुस्थानच्या इतिहासांत, या वेळीं; राजांस किंवा संस्थानिकांस क्षणभंगुरता येऊन, कोणा तरी बलवानांचें आपल्यास साह्य असल्याशिवाय आपला निभाव लागावयाचा नाहीं, अशा स्थितीस पोंचलेला, असा एक उदेपूरचा राणाच काय तो होता. कारण, तो अगदींच दीन व दुर्बल झाला होता. त्याप्रमाणें ता० १६ जानेवारी सन १८१८ रोजीं तहनामा होऊन, त्यावर राणा व इंग्रज यांच्या सह्या झाल्या; आणि त्यापुढच्या फेब्रुवारी महिन्यांत इंग्रजांचा वकील राण्याचे दरबारांत दाखल होऊन, तो नवीन तहाप्रमाणें राण्याला कमीजास्त काय हवें नको तें बघावयास व राण्याचे संबंधाची सर्व व्यवस्था करावयास लागला. शिंदा हा राण्याचा जो मुलूख दाबून बसला होता व अन्यायानें त्याचा वसूल घेत होता, तो सर्व मुलूख त्याचेपासून ह्या इंग्रजी वकिलानें राण्याचा राण्यास परत दिला. त्याचप्रमाणें, राण्याचे जे सरदार वगैरे शिरजोर होऊन केवळ स्वतंत्रतेनें वागण्यास सवकले होते, त्यांना राण्याचे ताब्यांत व आज्ञेत वागतील असें केलें. रायपूर, राजनगर वगैरे किल्ले राण्याचे राण्यास परत मिळवून दिले. आणि कुमळमेर किल्ल्यावर असलेल्या रक्षकांच्या मागील कित्येक दिवसांच्या पगाराच्या बाक्या थकल्या होत्या, त्या सर्व चुकत्या करून, तो किल्ला खुद्द इंग्रजांकडेच ठेवण्यांत आला. आणि, तेव्हांपासून तो किल्ला जो त्यांचे ताब्यांत आहे तो अजून तसाच त्यांजकडे आहे.

ह्या वेळचें मेवाडच्या स्थितीचें वर्णन कर्नल टॉड् हा पुढें लिहिल्याप्रमाणें लिहितो. तो ह्मणतो:—

---

१. राण्याचा जो इंग्रजांशीं तह झाला त्या वेळीं त्यांचा सेनापति मेजर-जनरल सर आर्. डॉकिन् हा होता.

२. उदेपूरच्या दरबारांत इंग्रजांचा जो वकील पहिल्यानेंच नेमण्यांत आला तो या इतिहासाचा मूळचा लेखक कर्नल टॉड् हा होता. त्याला त्या वेळचा गव्हर्नर जनरल मार्किस् ऑफ् हेस्टिंग्ज् यानें "पश्चिम रजपूतसंस्थानांवरील राजकीय मुखत्यार" या हुद्द्यावर नेमिलें. कर्नल टॉड् याजकडे पहिल्यानें उत्तरभागच्या इंग्रजी लष्कराचा ताबा होता. व त्यानें सन १८१७-१८ सालीं आपल्या लष्कराच्या निरनिराळ्या अनेक भागावर सर्व प्रकारची देखरेख ठेविली. त्याच वेळीं त्यानें होळकर व बुंदी आणि कोटा येथील राजे यांशीं दळणवळण ठेवून कोट्याच्या राजाशीं तहही केला.

"मी जहाजपूर येथून आरवली डोंगरावर पश्चिमेकडे ७० कोसांवर असलेल्या कु-
"मळमेर किल्ल्यावर येण्यास निघालों. इतक्या प्रदेशांत मला दोनच काय तीं शहरें
"आढळलीं कीं, तीं, राणा हा आपला राजा आहे असें मानीत होतीं. पण तीं शहरें
"तरी काय अगदींच उद्ध्वस्त झालेलीं होतीं. त्यांतील पूर्वींची दाट वस्ती उठून जाऊन
"पातळ झाली होती. मी हा ७० कोसांचा प्रदेश चालून गेलों परंतु चोहोंकडे मला
"उद्ध्वस्तताच दिसली. मनुष्यांच्या पायवाटाही अगदीं बुजून जाऊन, तिकडून कधीं मनुष्यें
"वागल्याचीं चिन्हें देखील दिसतनाशीं झालीं होतीं. चोहोंकडे बाभळींसारखे वनवृक्ष
"आणि जाड जाड बोरूंचीं बेटें वाढलेलीं दिसत होतीं; व त्यांच्यामध्यें रानडुकरें व भयं-
"कर वाघ यांची वस्ती झाली होती. मोठमोठ्या रहदारीच्या रस्त्यांची ही दशा! पूर्वी
"जो जो प्रदेश अतिशय भरभराटींत होता त्याची त्याची ही अशी अवस्था झाली होती;
"आणि त्या त्या प्रदेशाच्या ह्या विपरीत काळाचें चित्र प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभें राहत
"असे! राजपुतान्यांत भिलवाडा ह्या नांवाचें एक मोठें व्यापारी शहर होतें. हें शहर
"मीं १२ वर्षांपूर्वी बघितलें होतें. इ० स० १८०६ च्या मे महिन्यांत मी एकदां ह्या
"भिलवाडा शहरांत गेलों होतों. त्या वेळीं तेथें सहाहजार कुटुंबें आपल्या परिवारांसह
"रहात असत; व तुलनेनें पाहिलें असतां इतर शहरांपेक्षां तें त्या वेळीं बऱ्याच भरभ-
"राटींत होतें ह्मटलें तरी चालेल. परंतु ह्या वेळीं, (इ० स० १८१८ च्या फेब्रुवारी
"महिन्यांत), तेथें पूर्वींच्या वस्तीचा मागमूसही दिसला नाहीं! ह्या भिलवाड्यामध्यें
"शिरून मी त्याच्या पूर्वींच्या नगरवीथींतून जाऊं लागलों. तों सर्वत्र शुष्क आणि स्तब्ध
"दिसलें! एकही जिवंत प्राणी त्या शहरच्या राजमार्गांमध्यें मला आढळला नाहीं. एक
"कुत्रा मात्र तेथें एका देवळांत एकटाच राहत असे. तो, हे आह्मी त्याचे अपरिचित
"लोक बघून, भीतीनें लागलाच तेथून पळून गेला. ही सर्व स्थिति पाहून मला तर स-
"खेदाश्चर्य वाटलें. माझे बरोबर असलेल्या एका लष्करी शिपायानें त्या देवळांतल्या
"आदिनाथ नामक उघड्यानागड्या पडलेल्या देवास आपल्या अंगावरील एक तांबडें
"फडकें देऊन त्याचें शरीर आच्छादिलें!"

इंग्रजांचा हा मुख्य वकील उदेपुराजवळ आल्याचें कळल्याबरोबर राण्यानें त्याचें स्वागत करण्यासाठीं आपल्या दरबारचे लोक त्याचेकडे पाठविले. ते लोक, उदेपुराबाहेर नाथद्वारा येथें इंग्रजांचा गोट होता, त्या गोटांत येऊन वकिलास भेटले. नंतर इंग्रजी वकीलही त्या दरबारी लोकांकडे परत भेटीस गेला. तों त्या वेळीं त्यांनीं राण्याकडून आणलेलें कुमळमेर किल्ल्याचें बक्षिसपत्र त्या वकिलाचे स्वाधीन केलें, तेव्हां अर्थात् त्या वकिलास मोठा संतोष झाला. नंतर सर्व मंडळी उदेपुरांत दाखल झाली. तेथें राण्यानें आपला पुत्र युवराज जवानसिंग यास त्याच्या राजकीय ऐषआरामासह ह्या इंग्रजी वकिलास सामोरें पाठविलें होतें; त्याणें, रीतीप्रमाणें मोठ्या अगत्यानें ह्या वकिलास आपल्या राजधानीमध्यें नेऊन राण्यास भेटविलें.* ह्या भेटींच्या थाटाचें वर्णन कर्नल टॉड् यानें फारच नामी केलें आहे. तो ह्मणतो:—

"**राण्याची व आमची भेट**—उदेपूर नगरांत राजवाड्यापासून एक कोसावर
"एक जागा तयार केली होती. तेथें सत्रंज्या व गालीचे पसरून उत्तम प्रकारची बैठक
"तयार केली होती. तेथें पहिल्यानें राजपुत्र युवराज जवानसिंग हा मला येऊन भे-
"टला. ह्या राजपुत्राच्या प्रथम दर्शनाबरोबरच त्याचे सर्व चांगले गुण मला दिसले.
"त्याचा तो राजबिंडा चेहरा, त्याची ती दरबारी थाटाची बोलण्याचालण्याची रीति
"आणि तो त्याचा राजकुलास शोभविणारा ऐटदारपणा;-तरी त्याची ती विनयसंप-
"न्नता-हीं बघून, हा मोठ्या कीर्तिमान् वंशामध्यें जन्मलेला आहे असें त्याजकडे पाह-
"णाराच्या मनांत ताबडतोब आल्यावांचून रहात नसे. ह्या राजपुत्रास मीं पूर्वी ए-
"कदां, जेव्हां तो अगदींच लहान होता तेव्हां, बघितलें होतें. परंतु त्या वेळीं हा
"युवराज इतक्या गरीबीनें कधीं तरी मला भेटेल अशी मला कल्पनाही नव्हती. परंतु
"तो काळ फिरून, हल्लीं, त्या महाप्रतापशाली प्रतापसिंगाचा वंशज पुरुष अशा सलगीनें
"माझें स्वागत करण्यास पुढें आला; हें पाहून मला जें काय वाटलें तें सांगतां येत
"नाहीं. कालगति विचित्र आहे, या युवराजाचा चेहरा त्याच्या इतिहासप्रसिद्ध पराक्रम-
"शाली राजकुळास शोभणारा असाच होता.

"आह्मीं सूर्यदरवाजानें उदेपूर शहरांत प्रवेश केला. आमच्या गमनमार्गाचे दोहों
"बाजूंस झाडें लागलेलीं होतीं. तथापि, तो मार्ग एका ओसाड व पडित झालेल्या शह-
"रांतून जात आहे असें आह्मास वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. येथेंच प्रसिद्ध रामप्या-
"रीचा महाल होता. हा महाल राजपुतान्यांतल्या इतर राजमहालांप्रमाणेंच चतुष्कोणी
"व अनेक मजल्यांचा होता. त्या महालाची शोभा फारच चांगली आणि वर्णनीय होती.
"चोहोंकडे जाळीदार काम व निरनिराळ्या दालनांत समोरासमोर सोयीवार खोल्या
"केलेल्या, आणि मध्यें एक प्रशस्त व उघड्या हवेचा दिवाणखाना, अशा तऱ्हेच्या ह्या
"वाड्यांत आमच्या स्वागताची सर्व तयारी केली होती. हाच वाडा पुढें उदेपुरांत इं-
"ग्रज सरकारचे रेसिडेंटाच्या वसाहतीची जागा झाला. तेथेंच एका बाजूस आमच्या
"मेजवानीची सिद्धता ठेविली होती. त्या मेजवानीचा थाट तरी काय विचारावयाचा
"होता ? निरनिराळ्या प्रकारचीं शंभर गोड व मिष्ट पक्वान्नें आमच्याकरितां तयार
"केलीं होतीं. त्याचप्रमाणें, ताजी व सुकलेली फळफळावळ वगैरे पुष्कळच होती. तेथेंच
"एक हजार रुपयांची थैली आणून ठेविली होती. हे रुपये, राण्याच्या खानगी नौकरांस
"त्या वेळच्या आनंदप्रदर्शनार्थ वांटावयाचे होते. कारण, ज्यांनीं इंग्रज कंपनीचा वकील
"आपल्या राजधानींत येत आहे अशी संतोषकारक बातमी सांगितली होती, त्यांस
"अशा प्रकारचीं बक्षिसें देणें हें रजपूत राजांच्या शिरस्त्याप्रमाणें योग्यच होतें. राणे
"साहेबांची भेट दुसरे दिवशीं होण्याचें ठरलें.

"परंतु, दुपारीं चार वाजल्यावर राण्याचा मुख्य दिवाण व चोंडावतांचा मुखत्यार,
"असे चोबदार, भालदार व इतर मरातब यांसुद्धां आह्मांकडे येऊन, त्यांनीं आह्मांला

१. ही रामप्यारी कोण वगैरे खुलासा मागें पृष्ठ ३४४ येथें पहा.

"कळविलें कीं, 'राणेसाहेबांची तुमचें स्वागत करण्याची सर्व सिद्धता आंतांच झाली आहे.'
"आणि त्याप्रमाणें, आह्मी जेथें उतरलों होतों त्या वाड्यासमोर थोड्याच वेळानें लो-
"कांची अतिशय गर्दी जमली. सर्व लोक उत्तम प्रकारच्या वस्त्राभरणांनीं मंडित झाले
"असून, शांततेनें व स्वस्थपणें, गडबड किंवा गलबा न करितां, आमच्याकडे एकसारखे
"टकमक बघत उभे राहिले. नंतर आह्मी राजवाड्यांत जाण्यासाठीं निघालों. रस्त्यानें
"चाललों असतां चोहोंकडून, 'जय, जय, फिरंगीका राज !' ह्मणजे, 'इंग्रजांच्या रा-
"ज्याचा जय असो !' अशी आरोळी प्रत्येकाचे तोंडून निघत होती. ह्या वेळीं भाटही
"कांहीं स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं इंग्रजांच्या एजंटाचें नांव आपल्या कवितांमध्यें
"घेऊन नवीं नवीं पद्यें रचून त्याचें स्तवन करण्याचा सपाटा चालविला होता. ठिकठि-
"काणीं मंगलवाद्यें वाजविण्यासाठीं वाजंत्र्यांचे तायफे उभे केले होते, त्यांच्या वाद्यांचा
"मंजुल शब्द कानाला नादावून टाकीत होता व ते आपल्या वाद्यांमध्यें अनेक राग-
"रागिणीदार आलाप घेत होते. आणि, त्याचप्रमाणें, हेलकरणी स्त्रिया डोक्यावर पा-
"ण्याचे पितळी कलश घेऊन आमचें स्वागत करण्यास मधून मधून उभ्या होत्या व त्या
"तोंडांनीं सहेल्या ह्मणजे आनंदप्रदर्शक मंगलगीतें गात होत्या. रस्त्यानें जातांना भा-
"टांचीं किंवा त्या सहेल्या ह्मणत उभ्या असलेल्या स्त्रियांचीं गाणीं ऐकून प्रत्येकानें ए-
"केक रुप्याचें लहान नाणें त्या प्रत्येकीच्या कलशांत टाकावें व त्याचप्रमाणें त्या भाटां-
"सही द्यावें, अशी रीति आहे. कोणाही भाटाचें किंवा वाजंत्र्याचें अथवा सहेली ह्मण-
"णारणीचें गाणें ऐकिलें कीं, तें आपल्याला फार आवडलें व तें आनंदप्रद आणि मंगल-
"दर्शक आहे असें दाखविण्यासाठीं, वर लिहिल्याप्रमाणें, आपल्या शक्त्यनुसार त्या
"लोकांस कांहीं दिलेंच पाहिजे, अशी मेवाडप्रांतांतली रीति आहे. मग त्या गाण्यामध्यें
"आपली वाजवीपेक्षां फाजील स्तुति केली असली व ती आपल्याला आवडली नाहीं
"तरी त्यांच्या त्या गानवादनाप्रीत्यर्थ आपल्याला त्यांस कांहीं तरी दिलें पाहिजेच.
"असो. चोहोंकडे अगदीं गर्दी होऊन राजमार्ग तमासगिरांनीं गच्च भरला होता. आ-
"मचे लोक राजवाड्याजवळ गेल्यानंतर हत्तींवरून व घोड्यांवरून खालीं उतरले; व
"पायींच त्यांनीं राजवाड्यामध्यें प्रवेश केला. ह्या वाड्यामध्यें मोठमोठ्या गच्च्या आहेत.
"त्या गच्च्यांवर राण्याचे करमणुकीसाठीं कांहीं हत्ती व घोडे नेले असून ते तेथें नृत्य
"करीत होते. अशा प्रकारच्या करमणुकीचा राण्याला फार नाद असे.

"राजवाडा फार मोठा व मजबूत बांधलेला आहे. तो संगमरवरी पाषाण आणि दु-
"सऱ्या प्रकारच्या कठिण दगडांनीं बांधला आहे. त्याची पायथ्यापासून शिखरापर्यंत
"सुमारें ७० हात उंची आहे. ह्या वाड्यास बाजूला अष्टकोणाकृति कित्येक बुरूज का-
"ढून त्यांजवर मेघडंबरी किंवा घुमट चढविले आहेत. हा वाडा एकाच वेळेस एकदम
"बांधिला आहे असें नाहीं. निरनिराळ्या वेळेस व निरनिराळ्या कारकीर्दीत अनेक रा-

१. आह्मी ह्मणजे, एजंट, आमच्या मिशनाचा सेक्रेटरी क्याप्टन वॉघ, त्याच्या हाताखालचा लेफ्टिनंट केरी, आणि वैद्यकीय खात्याकडील डॉ० डंकन असे चौघे युरोपियन होतों.

"ण्यांनीं, त्यांना वाटेल तशी सुधारणा आणि विस्तार ह्या वाड्यामध्यें केला आहे. तरी, "त्या सुधारणा आणि तो विस्तार त्याला शोभेल अशा रीतीनें व सुरेख असाच केला "आहे; व त्याची दुरुस्तीही चांगली ठेवली आहे. असा भव्य, मजबूत, उंच आणि सु-"रेख बांधणीचा वाडा पूर्वदेशामध्यें दुसरा क्वचितच असेल. तो उदेपूरच्या तळ्याशीं "समांतर असलेल्या पर्वताचे ओळीवर बांधला असून, शिवाय तो, वर लिहिल्याप्रमाणें, "आणखी उंच चढविला आहे. ह्या वाड्याचे पुढच्या बाजूस एक विस्तीर्ण गच्ची आहे, "तिची लांबी वाड्याच्या रुंदीइतकी आहे. ह्या गच्चीचा मजबूतपणा वेगळ्या रीतीनें सां-"गावयास नकोच. त्याबद्दल वर सांगितलेंच आहे कीं, त्या गच्चीवर राणा आपले हत्ती "व घोडे खेळवीत बसत असे! ही गच्ची, उंच उंच अशा कमानींच्या तीन रांगांवर बां-"धली आहे. आणि ह्या कमानी, वर सांगितलेल्या डोंगराचे ओळीवरच्या उतरणीवर "चढविल्या आहेत. ह्या वाड्याच्या ह्या पुढच्या कमानींच्या भिंतीची उंची सुमारें ३२ "हात आहे. त्या कमानींच्या खालची जागा अर्थात् पोकळ असून, त्या जागेमध्यें रा-"ण्याच्या घोड्यांचे व हत्तींचे तबेले केले होते. गच्चीच्या व कमानींच्या मजबुतीविषयीं "तर कोणासच कधीं शंका येण्याचें कारण नव्हतें. ह्या गच्चीवर उभें राहिलें असतां उ-"देपूर शहराचा आणि त्याचे भोंवतालच्या बाऱ्यांचा पूर्ण देखावा पाहणाराला दृष्टीस "पडतो. मात्र भोंवतालच्या टेंकड्यांनीं आणि डोंगरांच्या रांगांनीं उदेपूरच्या बाहेरचीं "मोठमोठीं मैदानें दिसत नाहींत. परंतु, त्या गच्चीवरून राजवाड्याच्या उंच बुरजांवर "गेलें ह्मणजे तोही देखावा दिसण्यास अडचण पडत नाहीं. तेथून उदेपूरचा विस्तृत "तलाव, भोंवतालच्या डोंगरांचीं शिखरें आणि त्यांचे पलीकडचीं मैदानें हीं एकाच स-"पाटीवर आहेत अशीं दिसतात. अशा प्रकारें हा राजवाडा उदेपूर शहराचें एक मोठें "व मुख्य भूषण बनून राहिला आहे. अशा ह्या वाड्यामध्यें आमच्या स्वागताची सर्व "तयारी करविली होती.

"ह्या राजवाड्याच्या महादरवाजांत पहिल्यानें सिंधीलोकांचा पहारा होता. त्या दि-"वशीं शनिवार असल्यामुळें, नियमाप्रमाणें, सुक्तावत हे थोरल्या दिवाणखान्यांत जेथें "मंडळी जमली होती त्यांच्या व्यवस्थांकडे लागले होते. वाड्यामध्यें दिवाणखान्यांत "जाऊन पोंचेपर्यंत दोहों बाजूंस सारख्या ओळींनीं रजपूत मंडळी सशस्त्र उभी राहिली "होती. वाड्याच्या आंतल्या बाजूस एक गणेशदरवाजा आहे. त्या दरवाजांतून गेल्या-"वर दिवाणखान्याकडे जाण्याचा रस्ता आहे. दिवाणखान्याच्या दगडी जिन्याशीं आह्मी "गेलों. त्या जिन्याच्या पायऱ्यांवर मनुष्यांच्या सततच्या रहदारीनें पावलाच्या अर्धाल्या "खुणा वठलेल्या दिसल्या. जिना चढून वर गेलों तों तेथें मोठमोठ्यानें ललकारून वर्दी "देणारे चोबदार उभे असलेले दृष्टीस पडले. दिवाणखान्यांत जावयाला कित्येक दालनें "ओलांडावीं लागलीं. दिवाणखान्याचे दरवाजाशीं गेल्यावर भालदारांनीं ओरडून क-"ळविलें कीं, 'इंग्रजी वकील आपल्या भेटीसाठीं हजर झाले आहेत.' तेव्हां राणाजी "आपल्या सिंहासनावरून उठून कांहीं पावलें पुढें आले. व राणाजी उठले त्याबरोबर "दरबारांतले सर्व सरदारही उभे राहून त्यांनीं आह्मांला खडी ताजीम दिली. दरबारांतली

"सर्व व्यवस्था असावी तशी असून; ती फार काळजीपूर्वक केलेली असल्याचें दिसत "होतें. आमची जागा सिंहासनाचे पुढच्या बाजूला, राजाच्या गादीला लागूनच, केली "होती. मराठ्यांच्या भरभराटीचे वेळीं उदेपूरच्या दरबारांत पेशव्यांना जें स्थल यो- "जिलेलें असे तेंच स्थल आह्मां इंग्रजी वकीलमंडळीला ह्या वेळीं मिळालें होतें. व ह्या "स्थलाविषयीं, बरोबरीचें नातें वागविण्यास इच्छिणारांना कोणत्याही प्रकारें कमीपणा "वाटण्याचें कांहीं एक प्रयोजन नव्हतें. कारण, जी जागा आह्मांला योग्य तीच योजि- "लेली होती. ज्या महालांत हा दरबार भरविला होता, त्याचें नांव 'सूर्यमहाल' असें "होतें. सूर्यमहाल असें ह्या दिवाणखान्यास नांव देण्याचें कारण, त्यामध्यें जीं चित्रें "वगैरे काढिलीं आहेत त्यांत सूर्याचें चित्र मुख्य व मध्यभागीं काढलें आहे. ह्या "सूर्याचे चित्राजवळच राणाजीचें सिंहासन मांडलें होतें. त्या सिंहासनावर छत्रासा- "रखा रुप्याचे बारीक खांबांचा मंडप करून त्याजवर मखमाली चांदवा दिला होता. हें "सिंहासन किंवा राजगादी ह्मणजे एक लठ्ठ व उंच अशी मऊ बैठक असून, तिचेवर कला- "बतूचें काम केलेली मखमाली चादर पसरलेली असते. दरबारचे मुख्य सोळा सरदार "त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें राणाजीच्या उजवीकडे व डावेकडे बसलेलें होते. "त्यांचे खालच्या बाजूस राजपुत्र उमराव व जवानसिंग हे बसले होते; आणि इतर ठि- "काणीं दुसऱ्या प्रतीचे सरदार बसले होते. राण्याचे पुढच्या बाजूस त्याचे राज्यांतील "मुलकी व दिवाणी अधिकारी बसले होते. आणि शेवटीं राण्याचे खाजगी कारभारी "व घरगुती अधिकारी, नौकर आणि इतर अत्यंत विश्वासांतले लोक व साधारण प्र- "तीचे सरदार वगैरे बसले होते. ह्या वेळचा राण्याचा आनंद फारच मोठा, मनापासून "आणि अनिर्वचनीय होता. त्यानें, इंग्रजी वकिलांची भेट झाल्यावर, आजपर्यंत "त्याला जीं जीं दुःखसंकटें भोगावीं लागलीं व त्या संबंधानें त्याचें राज्य जें अगदीं "खराबीस आलें त्याबद्दलचें, थोडक्यांत परंतु ऐकणाराचे मनावर ठसेल असें वर्णन "केलें. त्याचप्रमाणें, त्यानें, 'आतां इंग्रज सरकारानें ह्या कामांत मन घालून आपलीं "संकटें दूर करण्याचें मनांवर घेतलें. येणेंकरून, हा आपलेवर व आपल्या राज्यावर मोठा "उपकार होत आहे,' असें बोलून दाखविलें. राणाजींनीं असेंही सांगितलें कीं, 'माझे "जन्मापासून मला कशी ती सुखाची झोंप आली नाहीं; ती आतां मी इंग्रजांच्या स्नेहानें "व दोस्तीनें घेईन.' राण्यानें हें जें भाषण केलें तें फारच आवेशानें, अस्खलित, इं- "ग्रजांविषयींची पूज्यबुद्धि मनांत बाळगून आणि अत्यंत कृतज्ञतादर्शक असें केलें. व तें "ऐकून, आह्माला त्याचेविषयीं मोठी करुणा उत्पन्न होऊन, त्याचेबद्दलचा आह्मीं अभि- "मान बाळगणें हें आह्मांस आमचें कर्तव्य वाटूं लागलें. राणाजीचें बोलणें ऐकून घेऊन "इंग्रजांच्या एजंटानें राणाजींस ममतापूर्वक कळविलें कीं, 'आमच्या गव्हर्नर जनर- "लास आपल्या कीर्तिमान् आणि वैभवशाली कुळाचा इतिहास सर्व विदित आहे. व "त्याचप्रमाणें, आपल्याला आजपर्यंत काय काय दुःखसंकटें भोगावीं लागलीं तींही "त्यास सर्व माहीत आहेत. आणि ह्या सर्व माहितीवरून गव्हर्नर जनरल साहेबांचीही "अत्यंत इच्छा आहे कीं, होईल तिकडून आपली कीर्ति आणि आपलें वैभव वाढवून, आपले

"राज्यांत शांति व स्वस्थता हीं कायम ठेवावीं.'' ह्याप्रमाणें परस्पर भाषणें झाल्यावर,
"राणाजीनें एजंटसाहेब आणि त्याचे बरोबरीची दुसरी मंडळी ह्यांस अनेक प्रकारचीं
"बक्षिसें दिलीं. एजंटसाहेबाला एक उत्तम प्रकारचा शृंगारलेला हत्ती व एक उमदा
"घोडा, रत्नखचित व जवाहिराचे अलंकार, आणि एक मोत्यांची कंठी, एक शाल व
"किनखापी पोषाख अशीं दिलीं. ह्याप्रमाणें देणगी झाल्यावर, विडे व अत्तरगुलाब दे-
"ऊन, त्या वकील मंडळीस राणाजीनें निरोप दिला. तेव्हां वकील मंडळीनें उठून मोठ्या
"अदबीनें राणाजींस लवून सलाम केला, आणि आपल्या मुक्कामावर येण्यासाठीं ते त्या
"महालांतून परतले. ती मंडळी आपल्या मुक्कामावर जाऊन पोंचल्यावर, थोड्याच वे-
"ळानें, राणाजी हा आपला दुसरा मुलगा बरोबर घेऊन, आपला दिवाण व निवडक स-
"रदार लोक यांचे सहवर्तमान, इंग्रजी वकीलमंडळीच्या परतभेटीसाठीं त्यांच्या मुक्कामीं
"आला. राणाजींची स्वारी आपल्या पुत्रासह आल्याचें कळल्याबरोबर एजंट आ-
"पल्या मकाणांतून बाहेर पडून पुष्कळ लांबपर्यंत राणाजींस व त्यांचे पुत्रास सामोरा
"गेला. व त्या राजकुलीनांस सन्मान देण्यासाठीं त्यानें आपल्या फौजेकडून सलामी दे-
"वविली. राणाजींसाठीं त्या वेळीं एजंटसाहेबानें मुद्दाम उच्चासन केलें होतें; त्या आ-
"सनावर त्याला आदरपूर्वक बसविलें. राणाजीनें प्रसन्नांतःकरणपूर्वक त्या सिंहासनावर
"बसून एजंटाबरोबर अनेक गोष्टींविषयीं संभाषण केलें. इंग्रजांच्या फौजेंत किंवा त्यांच्या
"एकंदर स्थितिरीतींत राण्याला जो आपल्या देशांतल्यापेक्षां कमीजास्तपणा दिसला त्याबद्दल
"त्यानें एजंटाला प्रश्न करून त्यांचा खुलासा करून घेतला. सुमारें अर्धा तास राणाजीची
"स्वारी ह्याप्रमाणें बसून बोलणेंसवरणें झाल्यावर एजंटानें राणाजीस एक हत्ती, दोन
"घोडे, त्यांजवर अनेक प्रकारचे सोन्याचे, रुप्याचे आणि सोन्यारुप्याचा मुलामा केलेले
"दागिने व कलाबतूचा उत्तम कशिदा काढलेल्या मखमाली झुली अशा सर्व यथास्थित
"थाटाची नजर अर्पण केली. याशिवाय शाली, किनखाप, मलमल आणि अनेक प्रका-
"रचीं रत्नें वगैरेंनीं भरलेलीं २१ ताटें राणाजीस नजर केलीं. युवराज उमराव हा
"या वेळीं आजारी असल्यामुळें आपल्या पित्याबरोबर ह्या दरबारास आला नव्हता;
"तरी, एजंटानें त्याचेसाठीं एक घोडा, आणि वर लिहिल्याप्रमाणें अनेक मोलवान् व-
"स्त्रप्रावरणांचीं ११ ताटें असा नजराणा राणाजीपुढेंच ठेविला. आणि, राणाजीचा
"दुसरा मुलगा व उमरावाचा भाऊ जवानसिंग हा तेथेंच हजर असल्यामुळें त्याला
"एजंटानें एक घोडा व ९ ताटें असा नजराणा अर्पण केला. शिवाय, इतर दिवाण,
"कारभारी व सरदार वगैरेंसही त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें नजराणे देण्यांत आले.
"ह्या एकंदर नजराण्यास एजंटाला २०,००० रुपये खर्च आला. हा जो भेटीचा व
"परतभेटीचा आणि नजरनजराण्याचा राणाजी व इंग्रजांचा एजंट यांचेमध्यें परस्पर
"समारंभ झाला त्याबद्दलच्या गोष्टी, पुढें कित्येक आठवडेपर्यंत राण्याचे सरदार, दिवाण,
"कारभारी व दरबारचे इतर वजनदार लोक यांमध्यें आणि त्याचप्रमाणें, व्यापारी व
"शेतकरी वगैरे लोकांमध्येंही, शांतिस्वास्थ्य असल्यामुळें, नेहमीं निघत असत; व त्या

"गोष्टींमध्यें ते लोक एकप्रकारें मनःपूर्वक आनंद व समाधान मानीत, असें दिसून येई[१]."

मेवाडच्या पूर्वीच्या आणि आतांच्या अंतर्बाह्य स्थितींत किती अंतर पडलें तें बघणें असल्यास त्याजबद्दल फार खोल व दूर जाण्यास नलगे. रजपुतांनीं आपल्या देशाची व्यवस्था अशा अशा तऱ्हांनीं ठेविली पाहिजे असे कांहीं स्वतंत्र कायदे अथवा ग्रंथ लिहून ठेविले नव्हते. त्यांची त्याबद्दलची योजना अगदीं स्वाभाविक आणि पाहिजे तशीं होती, व ती त्याप्रमाणें अखंड व अबाधित चालण्यांतच त्या देशाचें कल्याण होतें, ह्यांत संशय नाहीं. सर्व मेवाडदेश एकाचेच ताब्यांत रहावा अशी इच्छा कोणींच केली नाहीं. त्याचे भाग पाडून एकेक भाग एकेका राजानें संभाळावा अशी

---

१. ह्या वेळची मेवाडची स्थिति फारच दीन आणि शोचनीय झाली होती. सर्व लोक अतिशय त्रासले होते. कोणी तरी आपल्याला वाली असावा, असें त्यांस वाटत होतें. सर्वच लोक असहाय, असंरक्षित आणि उघडे पडल्यासारखे झाले होते. एक काळीं जो मेवाडप्रांत अतिशय सुपीक आणि सुसंपन्न होता; जेथें एक काळीं वीर्यशौर्य विद्युल्लतेसारखें चमकत होतें व त्याच्या मोंगलशत्रूंचे डोळे दिपवीत होतें; आणि ज्याचा इतिहास जगाच्या इतिहासांत अद्वितीय भाग होऊन राहिला होता; त्या मेवाडदेशाची ह्या वेळची स्थिति अशा रूपाला येऊन पोंचली हें बघून कोणालाही वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. ज्यांना रणदुंदुभीचा नाद ह्मणजे हर्षातिशयाला कारण व्हावा व तोच महामंगलप्रद ध्वनि असें ज्यांनीं समजावें; तरवार, भाला, बर्ची, ढाल आणि घोडा हेंच आपलें ऐश्वर्य असा ज्यांचा बाणा व मनोनिग्रह; त्या शूर रजपुतांचा तो समज, तो आवेश आणि त्यांचें तें पाणी ह्या वेळीं कोठें लपालें होतें बरें? सर्वच गाडें फिरून गेलें. रणवाद्यांचा आवाज आणि शस्त्रास्त्रांचें परजणें हीं त्यांस अत्यंत भयप्रद वाटूं लागून, त्यांचे अंगावर रोमांच उभे राहूं लागण्याचा काळ आला! असा प्रकार कां व्हावा हें समजत नाहीं. असो. सर्व लोक अस्वास्थ्य आणि अशांति ह्यांनीं अगदीं भांबावून गेले होते, एवढें खरें. त्यांना मुख्यत्वें शांतिस्वास्थ्याची फार अपेक्षा होती; व ती अपेक्षा इंग्रजांशीं त्यांची दोस्ती झाल्यापासून पूर्ण झाली, ह्यांत संशय नाहीं. इंग्रजांच्या शांतिस्वास्थ्याला पाहून ते लोक इतके खुष झाले कीं, ते त्यांस परमावधीचे सत्वशील समजूं लागले. सर्व प्रजा निर्वैर व निरहंकार होऊन आपआपल्या ठिकाणीं सुखानें राहूं लागली. वाघ आणि गाई यांनीं एके ठिकाणीं पाणी प्यावें, अशा प्रकारची निर्वैरता सर्वत्र अनुभवास येऊं लागली. ह्याबद्दल रजपुतांचे असे उद्गार निघूं लागले कीं, "शेर और बकरी एके थालीसे पीये!" ह्मणजे, लांडगा आणि शेळी हीं एका भांड्यांतून प्राशन करूं लागलीं! सर्व लोक सर्व प्रकारच्या चिंता, काळज्या व हुरहुरी यांच्यापासून मुक्त झाले; व त्यांना खात्रीनें निर्भयता वाटूं लागली. हें सर्व त्यांना त्या वेळीं फार सुखावह वाटलें खरें. परंतु या सुखाचे पोटांत आपल्याला परवशता आली व आपण परक्यांचे अमलांत गेलों, हा मोठा तोटा झाला; हें त्या बापड्यांचे लक्षांत बिलकुल वागलें नाहीं. ह्या शांतिस्वास्थ्यांत त्यांचें स्वदेशत्व व स्वराज्य हीं नष्टप्राय झालीं; हें त्यांना समजून आलें नाहीं. ह्या वेळीं त्यांस प्रतिदिवशीं, प्रतितासाला, सौख्य, स्वास्थ्य व शांति, हीं भासूं लागलीं खरीं; परंतु ह्या सौख्यस्वास्थ्यशांतीचे अंगभूत आपल्याला जें अत्यंत अनिष्ट असें परवशतेचें आणि परकीय स्वामित्वाचें बीज, तें रुजलें जात आहे, हें त्यांना मुळींच कळलें नाहीं!

व्यवस्था होती. सरहद्दींचें रक्षण करणारे ह्मणून वेगळेच लोक होते. त्यांनीं, डोंगरी आणि रानटी लोकांपासून ते देशभाग रक्षण करावे, आणि डोंगरांच्या बाऱ्या व घांट यांजवर पहारे ठेवबून आंतल्या लोकांस कोणाही परकीयापासून उपद्रव होऊं न द्यावा अशा प्रकारचा बंदोबस्त त्यांनीं ठेवावा, अशी व्यवस्था होती. आणि कदाचित् सरहद्दींचें रक्षण करणारांनींही क्वचित् फितूर होऊन आंतल्या भागावर कांहीं संकट आणल्यास त्यापासून रक्षण व्हावें ह्मणून, प्रत्येक राजानें आपल्या राजधानींत मोठमोठे किल्ले, कोट बांधून त्यांवर आपापल्या ऐपतीप्रमाणें फौजफांटा ठेविलेला असे. शिवाय, त्यांचे राज्यांतही सरदार असून त्यांना नेमणुका दिलेल्या असत; आणि त्या नेमणुकांप्रमाणें त्यांनीं आपलें लष्कर व शिबंदी तयार व जय्यत ठेविली पाहिजे, असा ठराव होता. त्या योगानें प्रत्यक्ष राजाला आपल्या फौजफांट्याची काळजी बाळगावयास नको असे. आणि, असे आपआपल्या बंदोबस्तांत असलेले सर्व छोटेछोटे राजे महाराणाजींचे मांडलिक असत. असा एकमेकांचा एकमेकांवर दाब व वचक राहून प्रत्येकाला आपआपला अधिकार भोगावयास सांपडत असे; आणि तेणेंकरून अंतर्बाह्य स्थितींत कमतरता व फेरबदल होण्याची बिलकुल भीति नसे. अशा व्यवस्थेनें मेवाडदेशाला कोणत्याही प्रकारच्या बाहेरच्या उपाधींची बिलकुल भीति नसे; व असें करण्यांत मेवाडच्या मुख्य गादीला खर्चही फार येत नसे. सारांश, बेताबातानें आणि व्यवस्थेनें राहतां येऊन, उलट, त्या देशाला दुसरे देशांवर आपला वचक आणि आपली इभ्रत राखण्याचें पूर्ण सामर्थ्य होतें.

परंतु, आतां त्या स्थितीला किती अंतर पडलें बघा. मेवाडदेशच्या सुव्यवस्थेचा तो काळ गेला. त्या देशावर अनेक संकटें आणि आपत्ति एकामागून एक येत गेल्यामुळें सर्वच मन्वंतर फिरलें. तें इतकें कीं, मेवाडची पहिली स्थिति काय होती याची कल्पना अथवा अनुमानही हल्लींचे स्थितीवरून करतां येणें मोठ्या मुष्किलीचें झालें आहे! त्या देशांतल्या पहिल्या व्यवस्था, पहिलीं खातीं आणि पहिले धरबंद अगदीं मोडून गेले; मांडलिक राजांना आणि ठाकुरांना तेज न राहून त्यांचा चोहोंकडे बोज राहीनासा झाला, व ते सर्वांकडून धिक्कृत होऊं लागले; सरदारांची नीति बिघडून ते अप्रामाणिक, राजद्रोही आणि बंडखोर बनले; देशांतले व्यापार, परस्परांचीं दळणवळणें व हुन्नरकलादिकांचा क्षय झाला; आणि सततच्या लढाया, बंडें व हाणामाऱ्या यांनीं शेतकी पडली राहून, चोहोंकडे दुष्काळ, दौर्भिक्ष्य, रोगप्रसार, आणि एकंदर लोकवस्तीची वाताहत हीं दिसूं लागलीं! ह्या वेळीं मेवाड कोणत्या स्थितींत होतें ह्याचें यथातथ्य वर्णन करण्यास आपली भाषा कोती, अथवा जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच, असें ह्मटल्याशिवाय राहवत नाहीं. मेवाडच्या

महाराण्याचे अमलांत दहाहजार भरभराटीचीं शहरें व तितके राजे त्याला करभार देऊन मांडलिक ह्मणून होते. ह्यांपैकीं हल्लीं काय ते तीनहजारांवर राजे किंवा ठाकूर आहेत. तेव्हां त्या सर्वांचे प्रस्तुतच्या स्थितीचें यथावत् वर्णन करणें अशक्य आहे. आतां ह्मणण्यासारखा भाग मेवाडची राजधानी जें उदेपूर शहर तें, त्याच्या बाऱ्या, घांट आणि त्याचे चितोड व मंडलगड हे किल्ले एवढाच काय तो होता. परंतु त्यांची व्यवस्था तरी काय होती ? राण्याचें उत्पन्न इतकें संपुष्टांत आलें होतें कीं, त्याचे ताब्यांत त्या वेळीं असलेले वरील चितोड आणि मंडलगड हे किल्ले संभाळण्यास त्याला जी फौज ठेवणें भाग होतें त्या फौजेच्या मुशाहिऱ्यापुरतें देखील त्याला उत्पन्न होत नव्हतें. इतकी हीनदशा आणि दारिद्र्य राण्याला आलें होतें. हे किल्ले ह्या वेळपर्यंत राण्याकडे राहिले ते तरी, त्याचे पदरच्या सरदारांनीं आपल्या स्वामीभक्तीस जागून त्यांचें संरक्षण केलें ह्मणून राहिले. खुद्द राण्याचा रोजचा निर्वाह केवळ कोट्याचा झालिमसिंग यानें चालविला होता ! राण्याचे सरदार वगैरे आपआपल्या जिंदग्यांचें रक्षण करण्यांत, किंवा त्या घालमेलींत प्रतिपक्षाकडील जिंदगी आपल्या ताब्यांत आणून ती सुरक्षित राखण्यांतच दंग झाले होते. त्यांस आपल्या राण्याची काळजी मुळींच नव्हती. आणि, ज्या सरदारांचे जवळ स्वतःची जिंदगी वगैरे कांहीं न राहून जे अगदीं बोन्येफकीर झाले होते, ते एकदम देशांत लुटालूट आणि धिंगामस्ती करण्यास प्रवृत्त झाले. त्या लुटालुटींत व धिंगामस्तींत त्यांनीं विचार व भेदाभेद मुळींच ठेविला नाहीं. वाटेल तेथें लुटालुटी आणि धिंगामस्ती चालविण्यास त्यांना शंका ह्मणून कशी ती उरलीच नाहीं.. पागेदारांनीं सरदारांवर, सरदारांनीं ठाकुरांवर, आणि ठाकुरांनीं मुख्य राण्यावर, ह्याप्रमाणें वाटेल त्यांनीं वाटेल त्यावर आणि आपल्यापेक्षां कमजोर व अशक्त बघितला कीं त्याचेवर रोंख धरावयाचा सपाटा चालविला होता. ह्या धिंगामस्तींत उच्चनीच, श्रेष्ठकंनिष्ठ इत्यादि भेदाभेद मुळींच राहिला नाहीं. ज्याचे मणगटांत जोर व ज्याला मनुष्यबल जास्त त्यानें आपल्याहून जास्त योग्यतेच्या व अधिकाराच्या मालकावर डोळा ठेवून त्याला वाटेल तसें नमवावें. त्याचेकडून जमिनी, इनाम, जुमले वगैरे लिहून घेऊन नंतर त्याचा पिच्छा सोडावा; असा प्रकार चालला होता ! ठाकूर, संस्थानिक वगैरेंनींही बघावें कीं, अशा बेबंद काळांत आपल्याला तरी कोठें वसूल आणि उत्पन्न होत आहे ? तेव्हां, ते बंडखोर मागत असल्याप्रमाणें भराभर जमिनी वगैरे त्यांस लिहून देण्याचा त्यांनीं सपाटा चालविला होता; व तेणेंकरून त्यांनीं आपला मात्र बचाव करून घेतला. खुद्द राण्याची स्थितीही अशीच चमत्कारिक झाली. त्याला सावकार फार. ज्याला त्याला राण्याकडे घेणें. वाटेल त्यानें आपल्या घेण्याबद्दल रा-

ण्याजवळ वाटेल तें मागावें, व तें राण्याला देणें भाग पडावें. जणूं काय अशा देण्याखालीं राण्यानें आपल्या स्वतःलाही देऊन टाकिलें असें झालें ! आणि तसें जर तो न करिता तर त्याला प्रतिक्षणीं मृत्यूची भीति होती! राण्याची एकट्याचीच ही अशी स्थिति होती असें नाहीं. हें वर जें सांगितलें आहे त्यावरून कळून येण्यासारखें आहेच. एकेकाच्या पोटांत अनेक पोटें, किंवा वारसदार व हक्कदार उत्पन्न झाले. जहागीरदारांच्या, इनामदारांच्या, मोकासदारांच्या, सरदारांच्या आणि ठाकुरांच्या पोटांत अनेक जहागीरदार, इनामदार, मोकासदार, सरदार व ठाकूर आणि आणखी त्यांचे पोटांत अनेक पोटजहागीरदार, पोटइनामदार, पोटमोकासदार, पोटसरदार व उपठाकूर व उपसंस्थानिक असे झाले. शेजाऱ्यांचा शेजाऱ्यांना विश्वास नाहींसा झाला. मोठमोठ्या किल्ल्यांवर हल्ले होऊन ते धूळधाणीला मिळविले गेले; व त्यांतील लोकांस कापून टाकलें. शिवगड व लाव्हा ह्या किल्ल्यांचीही अशीच स्थिति झाली; व त्यांतील सर्व पाहरेकरी व संरक्षक कापले गेले. देशाच्या सपाटीवर आणि मैदानांत राहणाऱ्यांनींच जेव्हां ह्याप्रमाणें पुंडावीं मांडलीं, तेव्हां मेर व भील वगैरे डोंगरी व रानटी लोकही खालीं उतरून किंवा शेजारच्या मुलखांत शिरून, त्यांनींही साधेल तितका आपला कावा साधून घेतला. ह्मणजे, त्यांनीं वाटा मारण्याचा धंदा चालविला. प्रवासी, व्यापारी, वगैरे जे कोणी रस्त्यानें जातील त्यांस लुटावें किंवा त्यांस भुलवून, थापा देऊन, अथवा अनेक कारणांनीं आपल्या वस्तीकडे नेऊन त्यांस अडकवून टाकावयाचें; आणि त्यांजकडून पुष्कळ पैसा घेऊन नंतर त्यांस सोडून द्यावयाचें; असा त्यांनीं क्रम चालविला. वाटेनें लग्नाचें वऱ्हाड चाललें, अथवा यात्रिक किंवा फिरस्ते वगैरे कोणी चालले तरी ते, या रानटी लोकांचे पाशांत सांपडून मुंडले व लुबाडले गेल्याशिवाय कधींच सुरक्षित पार पडल्याची वार्ता ऐकूं येईनाशी झाली. रजपूत लोकांची पहिली नीति व त्यांचा पहिला बाणा आतां नष्टप्राय होऊन, उलट, ते लोक, वरील लुटारू भील वगैरे लोकांस मिळून, त्यांच्या लुटींत आपण भागीदार होऊं लागले. यामुळें तर त्या अडाणी लोकांस कोणाचाच धाक व जरब राहिली नाहीं. आणि ह्या योगानें मेवाडदेशांतला व्यापार व दळणवळण एकंदर बंद पडल्यासारखें झालें, ह्यांत आश्चर्य नाहींच. असें जरी होतें तरी, त्या देशांतल्या ह्या अव्यवस्थेनें त्याचे बाहेरच्या प्रदेशांत त्याचा फारसा कांहीं उपद्रव अनुभवास आला नाहीं. मेवाडाशिवाय बाहेरच्या प्रदेशांतून व्यापारटापार चालावयाचे ते अप्रतिबंध चालू होते. मात्र व्यापारी लोकांचा मेवाडांतून जेवढा मार्ग असे, तेवढ्यापुरता ते आपल्या मालावर चांगला बंदोबस्त ठेवून व वाटेवरच्या लुटारू जकातदारांस पुष्कळशी जकात वगैरे भरून, पार पडत. कीं, मग त्यांस हिंदुस्थानांत कोठेंही अड-

थळा व आडकाठी नसे. युरोपखंडांतला व काश्मीरदेशचा पुष्कळ माल ह्याप्रमाणें बिनधोक रीतीनें ह्या वेळीं हिंदुस्थानांत फिरत असे व त्याचा चांगला व्यापार चालत असे.

ह्या वेळच्या मेवाडचे ह्या स्थितीचा नमुना पाहणें असल्यास उदेपूरशहर आहे. तें शहर बघितलें ह्मणजे, वर लिहिलेल्या वेळीं, मेवाडदेशाची काय स्थिति होती ती सर्व कळून येईल. असें ह्मणतात कीं, उदेपूर शहराचे कोटांत ५०,००० घरांची वस्ती होती. परंतु आतां तीं सर्व घरें आहेत काय ? आतां तर ३,००० घरें देखील उदेपूरशहरांत असतील नसतील. बाकीचीं सर्व घरें पडून त्यांचीं खिंडारीं झालीं आहेत. त्यांचीं छपरें वगैरे लोकांनीं जळाऊ लांकडांच्या ऐवजीं उपयोगास लाविलीं. सन १८१८ सालीं उदेपूरच्या ४० कोश लांबीच्या पल्ल्याचे एकंदर राज्यांत अवघें ४०,००० रुपयांचें उत्पन्न झालें ! आणि ह्या वर्षी, मागील कांहीं वर्षांच्या उत्पन्नाशीं तुलना करून बघतां, तिप्पट धान्य जास्त पिकलें होतें असें ह्मणतात; व रुपयास सात शेरप्रमाणें ह्या वर्षी धान्य विकलें गेलें; ह्मणून तरी वर लिहिलेलें उत्पन्न झालें होतें. कोटारियोच्या ठाकुराचें घराणें स्वामीभक्तीविषयीं आणि राजनिष्ठेच्या संबंधानें मेवाडच्या इतिहासांत अतिप्रसिद्ध आहे. त्याच्या संस्थानचें सालाचें उत्पन्न ५०,००० रुपयांचें होतें. परंतु ह्या वेळीं त्याच्या उत्पन्नाचें मान बघितलें तर, त्याला राण्याकडे भेटीला जावयाचें होतें तेव्हां, त्याला बसायाला स्वतःचा घोडा देखील नव्हता ! मोठ्या उत्पन्नाचें संस्थान असून करायचें काय होतें ? जमिनीची लागवड होऊन व जाण्यायेण्याचे रस्ते वाहते राहून, शेताभातांचें व व्यापार वगैरेंचें उत्पन्न होईल, तेव्हां ना संस्थानिकांस व ठाकुरांस पैसा मिळणार ? ह्या वेळीं सर्व देश उद्वस्त व ओसाड पडला होता. तेव्हां उत्पन्न होतें कोठचें ? खुद्द राण्याचीच स्थिति बघितली तर बघा आपल्याला काय समजतें तें. भरमोंगलाई अमलांत, ज्या रजपुतांनीं बाबर, अकबर व औरंगजेब या मोठ्या शूर, अभिमानी व बलवान् बादशाहांशीं टकरा मारून त्यांस जेरीस आणिलें, त्याच रजपूत वंशांतल्या मुख्य छत्रधारी महाराण्याजवळ, ह्या वेळीं ५० घोडे देखील नव्हते; व तो सर्वांशीं कोटासंस्थानचा ठाकूर झालिमसिंग याचे दातृत्वावर व औदार्यावर आपला कसाबसा निर्वाह करून होता !

ह्याप्रमाणें मेवाडदेशाच्या उच्चनीचावस्थेची आणि उन्नतपतनस्थितीची हकीकत आहे. मेवाडदेशाला जरी ह्या वेळीं परमावधीची नीचावस्था आणि पतनशीलता आली होती तरी, त्याच्या उच्चोन्नतीचीं मूलतत्वें अगदीं नाहींशीं झालीं नव्हतीं. तीं मूलतत्वें अस्तित्वांत होतीं, परंतु तीं बरींच विशकलित झालीं होतीं. मेवाडदेशां-

तल्या लोकांचें जीवित ह्मणजे त्यांचा आवेश आणि पाणीदारपणा, हा केवळ लुप्तप्राय झाला होता असें नाहीं. त्यांना यत्किंचित् उत्तेजन आणि साहाय्य मिळालें असतें कीं, आपलें पूर्ववैभवैश्वर्य पुनः मिळविण्यास ते अगदीं सज्ज होते. मेवाडदेशाला ज्या दुःखयातना आणि संकटें व अपमान सोसावे लागले त्यांचें रजपूत लोकांना पूर्ण स्मरण होत होतें. व तो आपत्तीचा काल त्यांचे हृत्पट्टिकेवर खोल खोदिला गेला होता. त्यांना ज्या प्रकारचा पाठिंबा पाहिजे होता त्या प्रकारचा पाठिंबा त्यांस त्यांचे देशांतील एकाही सरदाराकडून अथवा संस्थानिकाकडून मिळाला नाहीं. तो आतां इंग्रजांकडून मिळाला. इंग्रजांचें शौर्य, त्यांचा व्यवस्थितपणा आणि त्यांचें वचनप्रामाण्य हीं बघून, लुटारू, दंगेखोर, अडाणी आणि भील वगैरे डोंगरी व रानटी लोक यांसही मोठा चमत्कार वाटून, ते त्यांचेविषयीं आदरप्रयुक्त भीति बाळगूं लागले. इंग्रजांच्या युक्त्या, त्यांचा बिनबोभाट व्यवहार, आणि त्यांच्या सैन्याची वगैरे उत्तम व अनुकरणीय टापटीप हीं पाहून त्या लोकांना तर असें वाटे कीं, हे कोणी देवाचे घरूनच आलेले सर्वव्यवहारनीतिकुशल असे लोक आहेत. त्यांना असेंही वाटे कीं, इतकी अद्भुत शक्ति या लोकांमध्यें आहे; तेव्हां ते कोणी तरी जादूगार असावे व त्यांजमध्यें कांहीं तरी गौडबंगाल असावें. कारण, त्यांजमध्यें असें गौडबंगाल नसतें तर, एक मनुष्य इतकें सैन्य बिनबोभाट आपल्या ताब्यांत वागवूं शकला नसता. जणूं काय त्यांचा तो एकटा सेनाधिपति आपलें सैन्य आपल्या खिशांत बाळगतो! त्याचप्रमाणें, त्याचा दरारा असा असतो कीं, त्यानें हत्यारबंद लोकांचीं नुस्तीं कागदी चित्रें कातरून उभीं केलीं तर त्यांचेपुढें देखील कोणालाही टिकाव धरवावयाचा नाहीं! आणि, इंग्रजांच्या अशा दराऱ्यामुळें लोकांची समजूत दिवसेंदिवस त्यांचेविषयीं अधिकाधिक सभयादर होत चालली. त्यांचें नांव ऐकिल्याबरोबर मेवाडदेशांतल्या लुटालुटी बंद झाल्या; आणि सातशें खेड्यांतले रानटी व डोंगरी लोक, जे आपल्याला अरण्याधिपति ह्मणवीत होते ते सर्व इंग्रजांना शरण येऊन त्यांनीं इंग्रजांशीं तह केले व त्या तहांवर त्यांनीं आपल्या कटारींच्या निशाण्यांनीं सह्या केल्या. त्या तहामध्यें त्यांनीं इंग्रजांना अशीं वचनें दिलीं कीं, 'ह्यापुढें आतां आह्मी लुटण्यालुबाडण्याचा धंदा अगदीं सोडून देऊन, इतर चांगल्या प्रकारचे व उपयोगी असे उद्योगव्यवसाय करून निर्वाह करूं. देशांतल्या लोकांना ताप आणि त्रास देणार नाहीं.' ह्याप्रमाणें, जे लोक स्वभाविकच दुष्ट आणि अडाणी, ते देखील इंग्रजांशीं अगदीं नम्रतेनें व आदरप्रयुक्त भीति बाळगून वागूं लागले. त्यांच्यांतील प्रत्येक मनुष्य आपल्या मनुष्यपणावर येऊन अगदीं मऊ झाला, व त्यानें इंग्रजी अधिकाऱ्याकडे आपल्याला बांधून दिलें. ह्याप्रमाणें त्या लोकांनीं आपला

तह आणि त्या तहांतील वचनें एखाद्या धर्मसंबंधी गोष्टीप्रमाणें एक वर्षपर्यंत पाळिलीं. परंतु पुढें एक वर्षानंतर त्यांचा तह मोडला. तो त्यांनीं मोडला नाहीं. त्यांचे मताविरुद्ध मोडला गेला. त्याची हकीकत पुढें अनुक्रमानेंच देण्यांत येईल.

रजपुतांचे मनावर दिवसेंदिवस इंग्रजांविषयीं अधिकाधिक वजन आणि दरारा बसत चालला. दक्षिणेकडे मराठ्यांबरोबर इंग्रजांची लढाई सन १७८७ पासून सुरू झाली. पहिल्यानें राघोबादादा पेशवे यांशीं लढाई झाली. पुढें १८०३ मध्यें शिंदे, होळकर वगैरे मराठे सरदारांशीं इंग्रजांचें युद्ध होऊन त्यांस हटविलें; आणि शेवटीं १८१७ सालीं पेशव्यांचा अखेरचा पुरुष जो बाजीराव यास इंग्रजांनीं गादीवरून काढून तें राज्य खालसा केल्यामुळें तो पुण्याहून महायात्रेसाठीं उत्तरहिंदुस्थानांत त्याच वेळीं चालता झाला. ही गोष्ट रजपुतांमध्यें इंग्रजांविषयीं महत्वं वाढण्याला विशेष कारण झाली. रजपुतांना हतवीर्य करण्याला मूळ कारण मराठे झाले असून, ते त्यांस अजिंक्य वाटत होते. वीसहजार रजपुतांच्या संगिनींचाही ज्या मराठ्यांपुढें उपाय चालला नाहीं, त्या मराठ्यांचे राज्याची ज्या इंग्रजांनीं वाताहत करून दिली, त्या लोकांचा पराक्रम किती असावा ? असें साहजिकच सर्व रजपुतांच्या मनांत आलें असावें. व त्यामुळें त्यांजमध्यें इंग्रजांविषयीं विशेष पूज्यबुद्धि उत्पन्न होणें साहजिकच होतें. त्यांच्या ह्या पूज्यबुद्धीनें त्यांचेवर असा कांहीं परिणाम झाला, व इंग्रजांकडून दुसऱ्या ज्या अनेक शौर्यवीर्याच्या, न्यायाच्या व व्यवस्थितपणाच्या गोष्टी होत त्यांचे योगानें त्यांचे मनावर असा कांहीं ठसा वठला कीं, तसा ठसा वठविण्यास व त्याचा त्यांजवर सुपरिणाम होण्यास त्यांचेवर मोठें सैन्य पाठवून किंवा त्यांना दुसऱ्या कांहीं शिक्षा लावूनही तें काम झालें नसतें. रजपुतांमध्यें शांतता, भरभराट आणि सुखानुभव हीं जीं त्यांस पुष्कळ दिवसांत मिळालीं नव्हतीं तीं इंग्रजांच्या योगानें ह्यापुढें मिळूं लागलीं; व इंग्रजांच्या हेतूप्रमाणें सर्व गोष्टी घडून येऊं लागल्यामुळें त्यांनाही आपल्या श्रमाची सार्थकता वाटून, त्यांनीं जे दुसरे अनेक बेत योजिले होते ते तूर्त बाजूला ठेवून कांहीं दिवस विश्रांति घेण्याचें योजिलें. आणि, अशी विश्रांति त्यांनीं कांहीं दिवस घ्यावी असा त्यांस हक्कही होता.

मेवाडचा इतिहास यापुढें चालविण्याचे अगोदर तेथील मूळची राज्यव्यवस्था कशी काय होती तिची माहिती येथें थोडीशी दिली असतां बरें होईल. ह्मणजे तेथील पूर्वीच्या आणि ह्यापुढें चालू झालेल्या राज्यव्यवस्थेंत वगैरे काय तफावत पडली तें समजण्यास एक प्रकारें सोयीचें होईल. ही पूर्वीची राज्यव्यवस्था ह्मणजे, मेवाडांत सर्वत्र स्वस्थता असून, राण्याचा अधिकार व तेज असावें तसें होतें त्या वेळची आहे. व ती असावी तशी आणि अगदीं साधी होती, असेंही आढळून येईल.

उदेपूरच्या राज्यांत मुख्य आणि सर्वांत श्रेष्ठ असे चार अधिकारी आहेतः—

पंहिला–प्रधान अथवा मुख्य मंत्री;

दुसरा–बक्षी अथवा सेनापति;

तिसरा–सुरतनामा अथवा दफ्तरदार; आणि

चौथा–सहाई, ह्मणजे शिक्केनवीस किंवा राजमुद्राधारी.

पहिला अधिकारी प्रधान अथवा मुख्य मंत्री, याजकडे मुलकी, दिवाणी आणि फौजदारी अधिकारांतलें एकंदर काम असतें. हा प्रधान लष्करी खात्यापैकीं नेमण्यांत येत नाहीं. सर्व जाबसाली हिशेबी काम त्याचेच ताब्यांत असावयाचें व त्यानेंच त्याबद्दलची सर्व व्यवस्था करावयाची. ह्या प्रधानानेंच आपल्या राज्यांत सुभेदार, मामलेदार, न्यायाधीश, जमातदार, नाकेदार, वसूलदार वगैरे मुख्य मुख्य अधिकारी नेमावे. प्रधानाचे हाताखालीं एकंदर १४ खातीं असावयाचीं. ह्या १४ खात्यांत एकंदर मुलकी, दिवाणी, फौजदारी व इतर कारखान्यांचीं वगैरे सर्व कामें येतात.

दुसरा अधिकारी बक्षी किंवा सेनापति, हाही लष्करीखात्यांतील अधिकारी नेमावयाचा नाहींच. तो प्रधानासारखाच चांगला माहितगार व वजनदार असा निवडून काढावयाचा. याजकडे सर्व लष्करसंबंधीं व कांहीं मुलकींतलेही अधिकार असतात. लष्कराची सर्व प्रकारें व्यवस्था ठेवून, लष्करी लोकांचे पट ठेवणें, त्यांच्या नेमणुका करणें, त्यांचे शिधे, त्यांचे मुशाहिरे, त्यांच्या जनावरांच्या चंदीवैरणी, त्यांचीं हत्यारें-पात्यारें, दारूगोळा, पोषाख, इत्यादींची सर्व व्यवस्था ठेवण्यास व पाहण्यास निरनिराळे अधिकारी नेमणें, वगैरे सर्व कामें ह्या सेनापतीकडे असावयाचीं. राजाचें निशाण नेहमीं याचेच ताब्यांत असावयाचें. सरहद्दीचें रक्षण, किल्ले, कोट, वगैरेंचा बंदोबस्त ह्या अधिकाऱ्याकडेच असावयाचा; आणि सर्व प्रकारचे परवाने वगैरे देण्याचें व जप्त्या काढण्याचें किंवा जप्तीचा माल ताब्यांत ठेवण्याचें हीं कामें ह्या अधिकाऱ्याकडेच नेमिलेलीं असतात. ह्या सेनापतीचे हाताखालीं आणखी चार चिटणीस असतात, तेः—१ ला, पत्रव्यवहार व खतेंपत्रें लिहिणारा; २ रा, हिशेबनीस; ३ रा, परवाने, सनदा व फरमान किंवा दानपत्रें लिहिणारा; आणि ४ था, बारनिशीदार.

तिसरा अधिकारी सुरतनामा किंवा दफ्तरदार, याचेकडे सरकारी व खाजगी हिशेबी जमाखर्चाचें व त्या संबंधाची एकंदर व्यवस्था ठेवण्याचें काम असावयाचें. या दफ्तरदाराच्या यादींप्रमाणें सर्व खर्चाचीं वगैरे कामें व्हावयाचीं. याचे हाताखालीं आणखी चौघे मदतनीस असतात. ते प्रतिदिवसाचा हिशेब ठेवतात व शिलकबाकीचा झाडा देतात. हिशेबी कागदपत्र एकंदर दफ्तरदाराचे ताब्यांत रहावयाचे.

आणि, चौथा अधिकारी सहाई म्हणजे शिक्केनवीस किंवा राजमुद्राधारी. हा सरकारी किंवा खाजगी जाबसाली पत्रव्यवहार ठेवणारा चिटणीसच म्हटला तरी चालेल. दानपत्रें, बक्षिसपत्रें, ताम्रपट, सनदा, वगैरे ज्या राण्याचे शिक्क्यानें लोकांस मिळावयाच्या, त्या ह्या शिक्केनविसाचे मार्फत मिळावयाच्या. म्हणजे, राजमुद्रा किंवा राजाची सही करण्याचा मुख्याधिकारच त्याचे हातांत असल्यामुळें, एकंदर राण्याचे सहीचा सर्व पत्रव्यवहार ह्याचे दृष्टीखालून गेल्याशिवाय राहावयाचा नाहीं. हा सहीचा अधिकार साळुंब्र्याच्या ठाकुराकडे[1] गेल्यापासून राण्याची मुद्रा किंवा शिक्का मागें पडून, त्याचे ऐवजीं राण्याचे हातच्या भाल्याचें मोर्तब होऊं लागलें; व सर्व प्रकारच्या दानपत्रांवर हें लष्करी मोर्तबच करण्याची सुरुवात झाली. सर्व प्रकारच्या यादी, पत्रकें,—मग तीं रोजचीं असोत किंवा नैमित्तिक असोत,—त्या सर्वांवर, ज्या खात्यांतलीं तीं असतील त्या खात्याकडील मुख्यानें आपली सही केली पाहिजे; तेव्हां, त्या यादीप्रमाणें किंवा पत्रकाप्रमाणें कोणतीही गोष्ट अमलांत यावयाची, असा निर्बंध आहे.

वर लिहिलेल्या मुख्य खात्यांशिवाय आणखी ३६ कारखाने आहेत. त्या कारखान्यांकडे न्याय, मुन्सफी, नोंदणी, टांकसाळ, खाजगी, शिलेखाना, जवाहीरखाना, जामदारखाना, नगारखाना, मोदीखाना, भटारखाना, जनानखाना, कायदेशाळा, पाकशाळा, गानशाळा इत्यादि भाग आहेत.

राण्याच्या ह्या सर्व कारखान्यांवर अधिकारी नेमण्याची कधीं पंचाईत पडली आहे असें कधींच झालें नाहीं व होण्याचा संभवही नाहीं. प्रत्येक कारखान्यावरील अधिकारी वंशपरंपरेचा असावयाचा; आणि ह्यामुळें कधींही कोणतीही जागा खालीं असावयाची नाहीं, व त्या जागेकरितां उमेदवार हुडकण्याचें कारण पडत नाहीं. परंपरेचे अधिकार राखण्यामध्यें ही मोठी सोय आहे. परंतु, अशा अधिकाऱ्यांमुळें, त्यांचे कामांत जशी हुशारी, चोखपणा आणि इमान रहावा तसा रहात नाहीं. असा अनुभव आहे. ह्या परंपरेच्या अधिकाऱ्यांमध्यें सद्गुणी पांचोली अथवा निःसीम अमरचंद यांच्यासारखे अधिकारी क्वचित् सांपडतील. गुणवान् पांचोली यानें तर असें भविष्य केलें होतें कीं, मेवाडांतून ज्या अर्थी गुण आणि शील यांचा दिवसेंदिवस अस्त होत चालला आहे त्या अर्थी त्याजवर धुळीचें आवरण पडेल. आणि, त्याचे त्या भविष्याप्रमाणेंच ह्या वेळीं अनुभवही आला. मेवाडदेशची ह्या

---

१. साळुंब्र्याच्या ठाकुरानें आपल्याकडील शिक्केनविसाचा अधिकार चालविण्यास राण्याचे दरबारीं आपला एक मुखत्यार नेमून ठेविला होता. तो नेहमीं उदेपूरदरबारांत असे; व त्याबद्दल त्यांला एक गांव साळुंब्र्याल्यानें दिला होता.

वेळची स्थिति बघितली तर त्याजवर खरोखर धुळीचें आवरणच पडलें होतें असें ह्मटल्यास चिंता नाहीं ! मेवाडदेशांतली बुद्धिमत्ता, वजनदारी आणि प्रामाणिकपणा हीं जणूं काय अस्तंगत झालीं होतीं; व त्यामुळें कोणालाही खेद वाटल्याशिवाय रहात नसे. मेवाडदेशची ही स्थिति सुधारून त्याला ताळ्यावर आणण्याचा सध्यां कांहीं इलाज राहिला नव्हता. देशांत आपआपसांतच अनेक कुलंगडीं माजून लोकांमध्यें परमावधीचें अनैक्य झालें होतें. आणि त्यामुळें रजपूत लोकांची स्वाभाविक बुद्धिमत्ता, तिच्या प्रकटीकरणास योग्य कामें घडत नसल्यामुळें, गुप्त रूपानें राहिली होती.

बरें, राण्याची स्थिति आणि वर्तन तरी चांगलें असावयाला पाहिजे होतें; ह्मणजे त्याचे राज्यांत असलेलीं व्यंगें व न्यूनें अंशतः तरी झांकलीं गेलीं असतीं. त्याचें मंत्रीमंडळ असावें तसें नव्हतें; व त्याच्या त्या कमीपणावर, राण्याचे स्वभावगुण असावे तसे नसल्यामुळें जें पांघरूण पडायाचें तें पडण्यास मार्ग राहिला नाहीं. राणा भीमसिंग ह्यास आपले देशाचा पूर्वापर इतिहास चांगला अवगत होता; आपल्या देशाची उच्चनीचावस्था कसकशी होत गेली हें तो जाणत होता; व अशा स्थितीमध्यें कशी कांय व्यवस्था ठेवावी हेंही त्याला कळत नव्हतें असेंही नाहीं. तो स्वतः हुशार, शहाणा आणि सर्वांना आवडता होता; परंतु त्याचे बुद्धींत असावा तितका पोक्तपणा आणि गांभीर्य नव्हतें. पोकळ डौल किंवा भपका दाखविणें, भलत्यासलत्या मौजा व गमती करून कर्मणूक करणें आणि अपात्रीं व अप्रासंगिक औदार्य प्रकट करणें, हे दुर्गुण त्याजमध्यें फार भरले होते. व ह्या त्याच्या दुर्गुणांप्रमाणें आणि कलाप्रमाणें तो आपले हेतु पूर्ण करण्यास आपल्या अधिकाराचा आणि हुकमाचा वाटेल तसा उपयोग करून आपल्या लोकांस ज्यास्त ज्यास्त आवडता होण्याची खटपट करीत असे. आणखी त्याचेमध्यें हे दुर्गुण असत कीं, तो कधींही स्थिरचित्त आणि दृढनिश्चयी नसे. तो बहुशः आपल्या स्त्रियांच्या स्वाधीन फार असे. ह्या दुर्गुणामुळें मात्र लोकांना तो ज्यास्त ज्यास्त नावडता होत चालला होता. त्याला कोणी स्वस्थ व आराम घेत बसलेला पाहणें अगदीं आवडत नसे. तो कोठेंही गेला तरी त्यानें एखाद्या कामाविषयीं जी अगदीं खवदव करून द्यावी कीं, त्यावरून, त्याला त्याबद्दलची फार काळजी व आस्था आहे असें दिसावें; परंतु ती वेळ व तो क्षण गेला कीं, त्याची त्या कामाविषयीं नेहमींप्रमाणेंच अगदीं बेपर्वाई व उदासीनता दिसावी. त्याचेपुढें कोणाचीच मसलत किंवा युक्ति चालत नसे, व तो कोणाचे शब्दास मान देत नसे. तो असे चांगला कल्पक; परंतु कोणतेंही काम करण्याविषयीं जणूं काय तो अगदीं नवखा असे. अमुक काम करूं का नको ? अशा विचाराखालींच तें करण्याचें राहून,

तो प्रसंगही निघून जावा. राणा भीमसिंग याचे दरबारांत किसनदास हा पुरुष मात्र फार नेकीचा, सचोटीचा आणि कार्यसाधक होता. तो होता तोंपर्यंत राण्याच्या दरबाराचा आब आणि राण्याचें वजन चांगलें राखलें गेलें होतें. तो पुष्कळ दिवसपर्यंत राण्याचे वतीनें इंग्रजांकडे वकील होता. किसनदास याचे, राण्यावर आणि त्याचप्रमाणें आपल्या देशावर फार फार उपकार आहेत. व तो आणखी कांहीं दिवस वांचला असता तर त्याचा मेवाडदेशाला फार उपयोग झाला असता. परंतु त्याला आयुष्य कमी होऊन तो लवकरच मेला. ह्यामुळें त्याचे मागें तर सर्व बजबजपुरी झाली. अशा प्रकारें राण्याची, त्याचे दरबाराची, त्याचे राज्याची व एकंदर देशाची स्थिति होती. आणि अशा स्थितीमध्येंच इंग्रजांचा व त्याचा परिचय होऊन, इंग्रजांच्या मार्फतीनें मेवाडदेशांत सुधारणा व व्यवस्था होऊं लागल्या. इंग्रजांचा विचार, राजस्थानांतली पूर्वीची व्यवस्था आणि शांतता स्थापन करून, राणा, त्याचे मांडलिक ठाकूर किंवा संस्थानिक, आणि त्याचे सरदार व त्याचे राज्यांतील कुळंबी शेतकरीसुद्धां आपआपल्या योग्य अधिकाराला पावून, ते सर्व शांतिस्वास्थ्यानें राहतील असें करावयाचा होता. त्याचप्रमाणें, राण्याचे दोघे मुलगे राजपुत्र जवानसिंग आणि उमरावसिंग ह्यांचीही सर्व व्यवस्था ठीक ठीक करून त्यांचेमध्यें कोणत्याही प्रकारचा वाद किंवा भांडण राहूं नये असें करावयाचें होतें.

इंग्रजांच्या वकिलाला पहिलें आणि मुख्य काम हें करावयाचें होतें कीं, राण्याचे सरदार, ठाकूर, वगैरेंवर असणारें जें त्याचें राजकीय वजन आणि स्वामित्व तें बहुतकरून अगदीं नष्ट झालें असल्यामुळें, त्याचें पुनःसंस्थापन करावयाचें होतें. राण्याचे ठाकूर, सरदार, वगैरे लोक, आपल्यावर राण्याचा हुकूम आहे असें मानीत असल्याचें केव्हां समजावयाचें होतें ? त्यांनीं राण्याचे दरबारांत हजर राहून तो काय सांगेल तें ऐकावयाचें व त्याला आपला अभिप्राय द्यावयाचा, असें ते करीत असते तर ते राण्याचा मान ठेवीत होते व ते राण्याचे ताबेदार होते असें ह्मणतां आलें असतें. परंतु तशा रीतीनें वागण्याची त्यांची वहिवाट आलीकडे अगदीं मोडून, ती रूढिबाह्य झाली होती. कित्येक सरदार व ठाकूर राण्याचे दरबारांत तर कधींच गेले नव्हते; आणि जे कांहीं कधीं जात असत ते तरी त्यांच्या खुषीला व सोयीला आल्यास वाटेल तेव्हां जात असा त्यांचा स्वेच्छ क्रम चालला होता. परंतु हें त्यांचें स्वेच्छ वर्तन लवकरच मोडून, थोडेच दिवसांनीं राण्याचा दरबार, त्याचे सरदार आणि ठाकूर यांनीं भरलेला असा त्याचे दृष्टीस पडूं लागला. असा भरलेला दरबार राणा भीमसिंग यानें गेल्या पन्नास वर्षांत कधींही पाहिला नव्हता; व इतका मान व इतकी अदबी त्या लोकांकडून त्याला पूर्वीं कधींही दाखविण्यांत आली न-

व्हती. सर्व सरदार व ठाकूर हे एककालीं व एका दरबारांत एकदम आले कसे, व हें कोणत्या अगोचर शक्तीचें काम आहे, हें कोणासच कांहीं समजेना; व राणा तर हा चमत्कार बघून फारच विस्मय पावला! प्रसिद्ध दांडगा आणि बेबंद जो हम्मीर, ज्यानें थोडे दिवसांपूर्वीच कोव्याहून हाडाराणी आपल्या इतमामासह येत असतां, ती स्त्री वगैरे कांहीं एक मनांत न आणितां तिला लुटलें, तो सुद्धां ह्या वेळीं राण्याचे दरबारांत हजर होऊन, राण्याला जो योग्य मान द्यावयाचा तो त्यानें देण्यास नानू केलें नाहीं. याचप्रमाणें, संगावत जातीचा ठाकूर, ज्यानें उन्मत्तपणानें अशी प्रतिज्ञा केली होती कीं, 'राणा ह्मणजे कोण? त्याचे पुढें डोकें लवविण्यापेक्षां एखाद्या स्त्रीचे पुढें मी आपलें शिर नमवीन,' तो, भदेश्वर आणि देवगड ह्या किल्ल्यांवरील आपला हक्क सोडून व ते राण्याचे किल्ले असें ह्मणून, स्वामीभक्तीला उचित अशा लीनपणानें राण्याचे दरबारांत येऊन दाखल झाला आणि थोड्याच आठवड्यांत मेवाडचे एकंदर मांडलिक ठाकूर, संस्थानिक व सरदार वगैरे आपल्या राजधानींत एकत्र जमून, उदेपूरचा दरबार 'दरबार' ह्मणण्याला योग्य अशा रूपाला येऊन पोंचला.

ह्या ठाकूर व संस्थानिकांबरोबर उदेपूर राजधानीमधले जे लोक उठून गेले होते त्यांनींही फिरून येऊन आपआपलीं घरेंदारें संभाळून रहावें अशी व्यवस्था करण्याची इंग्रजी वकिलाची योजना होती. परंतु त्याप्रमाणें घडून येण्यास कांहीं वेळ लागावयाचा होता. कारण, जे लोक उदेपूर शहरांतून उठून जाऊन ज्या परमुलखांत वस्ती करून राहिले होते, तेथें तरी त्यांनीं आपल्या रक्षणाबद्दल त्या त्या मुलखाच्या अधिकाऱ्यांशीं जे करारमदार केले असतील ते करारमदार पुरे करून युक्तीनें त्यांना तेथून यावयाला पाहिजे होतें; व तसें करण्यास त्यांना अवकाश लागणें साहजिकच होतें. त्याचप्रमाणें, त्यांना जेथें जेथें आश्रय मिळाला होता तेथून तेथून त्यांना एकदम त्या आश्रय देणारांशीं घडलेला प्रेमसंबंध तोडून पुनः आपल्या राजधानीस परत यावयाचें ह्मटलें ह्मणजे जरा फुरसदीचीच गोष्ट होती. तेव्हां, अशा अनेक कारणांनीं उदेपूरचे लोक परत येण्यास सहजच पुष्कळ अवधि लागला. आणि तशा अवधीवांचून गत्यंतरच नव्हतें. ठाकूर, संस्थानिक, सरदार, वगैरेंस एकेकदां इंग्रजी वकिलाकडून यादी गेल्याबरोबर ते भराभर एकसमयावच्छेदेंकरून एकत्र जमले. परंतु तसें लोकांच्या संबंधानें कांहींएक करतां येण्याजोगें नव्हतें. कारण, लोक कांहीं ठाकूर, संस्थानिक अथवा सरदार यांचेप्रमाणें कोणाचे ताबेदार नव्हते. त्यांच्या इच्छेस व सोयीस वाटलें तर ते यावयाचे. त्यांचेवर कांहीं कोणाचा जोर चालावयाचा नव्हताच. इंग्रजी वकिलानें एवढें मात्र केलें कीं, चोहोंकडे जाहिरनामे प्रसिद्ध क-

रून, सर्व लोकांना, त्यांच्या जीवितवित्ताचे सुरक्षिततेविषयीं त्यांनीं कोणत्याही प्रकारची काळजी करूं नये व सर्व उदेपूरच्या प्रजाजनांनीं आतां कोणत्याही प्रकारची भीति किंवा चिंता मनांत न बाळगतां, आपल्या शहराचा व राण्याचा अभिमान बाळगून, पूर्ववत् त्याचे अमलांत व त्याचे आश्रयाला येऊन रहावें; आणि येणेंकरून, आपला स्वाभाविक जो स्वदेशाभिमान तो लोकांनीं प्रकट करण्याची सुसंधि गमावूं नये; अशा प्रकारचीं त्या जाहिरनाम्यांत अनेक आश्वासनें देऊन, जेणेंकरून त्यांची उदेपुरास परत येण्याची प्रवृत्ति होईल असे लेख प्रसिद्ध केले होते. याचप्रमाणें, परागंदा झालेल्या लोकांनीं परत उदेपुरास येऊन वस्ती केल्यास त्यांच्या जागा, शेतेंभातें, जमिनी, वगैरे जें कांहीं त्यांच्या हक्काचें व मालकीचें पूर्वी होतें त्यावर त्यांची मालकी पूर्ववत् कबूल केली जाईल व त्यांना सर्व प्रकारचें सुरक्षण देण्यांत येईल; त्यांना कोणाकडूनही ताप, जाच, पीडा, वगैरे देण्यांत येणार नाहीं; असें इंग्रजी वकिलाकडून राण्याचे मार्फत सर्वत्र प्रसिद्ध करण्यांत आलें. राण्याला इंग्रजांचें पूर्ण साह्य असल्यामुळें लोकांनाही पुष्कळ धीर आला, व बहुत लोक हळूहळू आपल्या जुन्या आणि प्रीतीच्या उदेपूर शहरांत येऊन वस्ती करून राहूं लागले. तेव्हां त्यांना जें सुख झालें त्याची किंमत, त्यांनीं पूर्वी भोगलेल्या सुखापेक्षां त्यांस फार ज्यास्त वाटूं लागली. आणि ही गोष्ट खरीच आहे कीं, सुखाची किंमत दुःखें अनुभविल्याशिवाय होत नाहीं. पुरुष पुरुष उंच व उभीं राहिलेलीं शेतें, मराठे पेंढाऱ्यांनीं आपले घोडे बेलाशक त्यांजमध्यें घालून खावविलीं; परंतु त्यांस शेतांच्या मालकांच्यानें कोणत्याही प्रकारें हरकत करवली नाहीं; अशी स्थिति ज्यांनीं पाहिली होती त्यांस, आतां सर्वत्र स्वस्थता होऊन जिकडे तिकडे शेतें, बागा, मळे, वगैरे उत्तम रीतीनें राखलीं जाऊन, तीं डोळयांना आनंद देण्यासारखीं हिरवींगार दिसूं लागलीं; तेव्हां त्यांना किती समाधान वाटूं लागलें असेल, याची कल्पना कोणासही सहज होईल. मोठमोठीं भरभराटीचीं शहरें पेंढाऱ्यांनीं बेलाशक लुटून त्यांना आगी लावल्या व तीं शहरें ज्वालामुखांत पडून त्यांचा सत्यानाश झाला; गुरेंढोरें पकडलीं जाऊन त्यांच्या दावणी पेंढाऱ्यांनीं आपल्या गोटांकडे निर्भयपणें हांकून नेल्या व त्यांची व्यवस्था त्यांना पाहिजे तशी त्यांनीं केली; आणि ठाकूर, संस्थानिक, सरदार, ग्रामाधिकारी वगैरेंस पकडून नेऊन त्यांजकडून शक्तिबाह्य खंडणी घेण्याचे उद्देशानें त्यांस अटकेंत व दाबांत ठेवण्याचा सपाटा चालविला होता; हे सर्व प्रकार ज्यांनीं आपल्या उघड्या डोळयांनीं बघितले, त्यांस त्या स्थितीचे अगदीं उलट असा समाधानकारक प्रकार बघून किती आनंद झाला असेल हें वेगळें सांगणें नकोच. आपल्या देशावर आलेलीं हीं अनेक आगंतुक संकटें नाहींशीं होऊन आपण शांतिसुखांत आपल्या घरांमध्यें बसून आनंदानें

मीठभाकर केव्हां खाऊं, आपल्या जीवाला निश्चिंतपणा केव्हां मिळेल आणि आपल्या जीवितवित्ताच्या संरक्षणाची खात्री आपल्याला कोण करून देईल, ह्या विवंचनेंत सर्व आबालवृद्ध होते. आह्मीं तर अनंत दुःखसंकटें भोगिलीं; परंतु आमचीं मुलेंबाळें तरी सुखासमाधानांत संसार करतील काय ? अशी सर्व लोक आशा करीत होते. आपत्प्रसंगीं त्यांनीं नाइलाजानें आपली राजधानी सोडून दूर ठिकाणीं जाऊन वस्ती केली. परंतु त्यांस जेव्हां वर लिहिल्याप्रमाणें इंग्रज लोकांच्यामार्फत राण्याचें आश्वासन मिळालें तेव्हां त्यांस पुनः परत आपल्या आपल्या ठिकाणीं येऊन राहण्यास किती आनंद झाला असेल हें सांगणें नकोच. उदेपूरचे पहिले रहिवासीच वरील आश्वासनानें उदेपुरांत येऊन राहिले असें नाहीं. तर, अगदीं नवीन, आणि पूर्वीं ज्यांच्या एकमेकांशीं ओळखीही नव्हत्या, तेही तेथें येऊन सुखासमाधानानें राहूं लागले. सर्व प्रजा अनाथ झाली होती; तिला कोणी तरी संरक्षक व धनी मिळाला पाहिजे होता; तो इंग्रज लोकांच्या साह्यानेंच पुनः मिळाला, असें सर्व लोक समजूं लागले. आपण सोडून दिलेल्या जागा, घरें, जमिनी, वगैरे आपल्याला पुनः मिळतील, अशी कोणासच आशा नव्हती. परंतु, त्या पुनः त्यांना परत मिळून सुखानंदानें त्यांचा उपभोग घेऊं लागले, व हा सुदिनच त्यांणीं पाहिला असें ते मानूं लागले. त्या वर्षाच्या आषाढमासीं (जुलै महिन्यांत) वद्य ३ चे दिवशीं, ह्मणजे, शेतकऱ्यांनीं आपलीं शेतें पेरण्यास जाण्याचे मुख्य दिवशीं, सर्व जातिधर्मांचे व धंद्याचे तीनशें लोक, आमलीं हत्यारेंपात्यारें व आउतें वगैरे गाड्यांत भरून, निशाणें, पताका लावून, वाद्यें वाजवीत, मोठ्या समारंभानें, जयजयकाराच्या गर्जना करीत, उदेपुरामध्यें पुनर्वसति करण्यासाठीं शिरले. त्यांनीं उदेपुरांत शिरण्यापूर्वीं प्रथमतः, वेशीमध्यें गणेशदेवाचें अर्चनपूजन केलें, व 'आतां, आह्मीं ह्या आमच्या प्रिय नगरांत पुनर्वसति करण्यासाठीं प्रवेश करीत आहोंत, तेव्हां, आह्मांला सर्व प्रकारची निर्विघ्नता असूं दे,' अशी त्याची प्रार्थना केली. इंग्रजांशीं राण्याचा तह झाल्यापासून सुमारें आठ महिन्यांत अजमासें तीनशांवर शहरें आणि गांवें एकसमयावच्छेदेंकरून लोकांच्या पुनर्वसतीनें गच्च भरून गेलीं; आणि ज्या शेतांना व जमिनींना मागील कित्येक वर्षांत ओसाडपणामुळें कधींही कुदळी लागली नव्हती व ज्यांमध्यें एक धान्याचा दाणाही पेरला गेला नव्हता, त्या सर्व जमिनी व तीं सर्व शेतें वरील आठ महिन्यांमध्यें नांगरलीं व पेरलीं जाऊंन, तीं मनुष्यवस्तीला शोभादायक आणि भूषणभूत अशीं हिरवींगार दिसूं लागलीं. चांगले दिवस आले ह्मणजे चोहोंकडूनच चांगलेपणा दिसूं लागून, लोकांना सर्वच चमत्कार वाटूं लागतो. जीं शहरें व गांवें निर्मनुष्य होऊंन, ज्यांमध्यें रानडुकरांच्या व इतर त्रासदायक जनावरांच्या वस्तींनीं

आपला अंमल बसविला होता, तीं शहरें व गांवें ह्याप्रमाणें मनुष्यांनीं फुलून, त्यांच्या शेतांत व जमिनींत पेरलेलें धान्य इतक्या जोरानें व उफाड्यानें वाढलें कीं जणूं काय, देवीनें, पेरलेल्या धान्याचें फल आपल्या कल्पनेपेक्षां व अजमासापेक्षां दसपट ज्यास्त दिलें, असें लोकांना वाटूं लागलें ! वस्तुतः जोरानें पीक येण्यास बहुत दिवस जमिनी पडित होत्या, हें कारण होतें. परंतु, लोकांनीं आपल्या त्या आनंदाचे भरांत हें सर्व प्रकारचें यश इंग्रज सरकारास देऊन, 'इंग्रज लोकांचें कल्याण होवो!' असा दुवा दिला. इंग्रजांनाही, आपण हातीं धरलेल्या एका कामांत ह्याप्रमाणें सिद्धि मिळाली ह्मणून, मोठा अभिमान वाटूं लागणें साहजिकच होतें. इतक्या दूरच्या व अगदीं परकीय अशा देशांत त्यांनीं आपला इतका पराक्रम गाजविला व इतकें वजन बसविलें, हें त्यांनीं कांहीं सामान्य कृत्य केलें नाहीं, हें कोणीही कबूल करील. आतां, त्यांनीं राजस्थानांत जी शांतता आणि आपलें एक प्रकारचें जें स्वातंत्र्य स्थापित केलें तें विशकलित होण्यास तेच आपल्या गर्विष्ठपणानें कारण झाले तर होण्याचा संभव होता. बाकी, त्यांनीं स्थापन केलेल्या शांतिस्वास्थ्यास आणि त्यांचे स्वतःच्या स्वातंत्र्यास यत्किंचित् कमीपणा आणण्याचें कोणाचेंही सामर्थ्य नव्हतें, ही गोष्ट कांहीं खोटी नव्हती.

इंग्रजी वकिलानें उदेपुरांत सर्व मांडलिक ठाकूर व सरदार यांची एके ठिकाणीं सभा भरविली, व त्याचप्रमाणें ओसाड प्रदेश पुनः वसविले, हीं जशीं दोन मोठालीं कामें केलीं, त्याचप्रमाणें, त्यांना तिसरेंही एक काम करण्याचें होतें, व तें त्यांनीं हळहळ केलें. कारण, ह्या तिसऱ्या कामावांचून वरील दोन्ही कामें पोकळच वाटलीं असतीं. सर्व मांडलिक व सरदार एकत्र जमण्याची रीति पाडली व परागंदा झालेले लोकही भराभर येऊन आपलीं घरेंदारें संभाळून राहूं लागले, ह्या गोष्टी झाल्या खऱ्या; परंतु, अशा नुस्त्या थोर लोकांच्या दरबारांनीं आणि लोकांच्या वस्त्यांनीं देशाचे अभिमानास आणि त्याचे उद्योगधंद्यास काय बर्कत येणार होती ? देशांत संपत्ति व भांडवल जर नाहीं तर देशाची स्थिति सुधारावी कशी ? उद्योगधंदे, व्यापारटापार, वगैरे चालण्यास देशांत भांडवलाची तर मोठी जरूर आहे. तें राजस्थानांत कोठें होतें ? परदेशीय व्यापारी आणि सावकार यांनीं राजस्थानाची दुःस्थिति पाहिल्यापासून त्या प्रांताचा अगदींच त्याग केला. आणि जे राजस्थानचेच व्यापारी व सावकार होते त्यांस सर्व देशाबरोबरच दारिद्र्यानें ग्रासलें; व आतां त्यांनीं पुढें व्हावयाचें तों, त्यांना शरमेनें वर डोकें करण्याचीही शक्ति व अवसान राहिलें नाहीं. सारांश, मेवाडांत पैशाची व भांडवलाची फार जरूर होती. लोकांमध्यें कांहींएक त्राण राहिलें नव्हतें. त्यांचे जवळचा सर्व पैसा बंडखोरांनीं आणि पेंढाऱ्यांनीं अगदीं